# नवभारत

वर्ष ९ वें ] जुलै १९५६ [ अंक १० वा



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.









नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# ‘नवभारत’ निधि

## -- विनंति --

‘नवभारत’ मासिक पुढें चालू रहावें, त्याची कार्यक्षमता वाढावी, या दृष्टीनें त्यास कांहीं आर्थिक स्थैर्य लाभावें याकरितां किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां जें एक विनंति-पत्रक प्रसिद्ध झालें तें विदितच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५वर सह्या असून सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, डॉ. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळया भागांतील निरनिराळया क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

‘नवभारत’निधि पुढें येतें वर्ष चालू रहाणार आहे. मूळ विनंतिपत्रकांतील विनंतीस मान देऊन ‘नवभारत’-निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, अशी आमची प्रार्थना आहे. ‘नवभारत’-निधीस १०० रु. ची देणगी देणारास ‘नवभारत’ मासिक दहा वर्षें मिळत राहील.

‘नवभारत’ निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें व पोहोंच ‘नवभारता’च्या दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

‘नवभारता’च्या गेल्या म्हणजे जून १९५६ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. आतां-पर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत.

‘नवभारत’निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमलेली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख. प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार), श्री. कृ. ना. फडके व श्री. मा. प. मंगुडकर (संयुक्त कार्यवाह).

‘नवभारत’ निधिसमितीचें कार्यालय “C/o ‘नवभारत’ मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४” येथें आहे. देणग्या, “खजिनदार ‘नवभारत’ निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर पुणें ४” या पत्त्यावर पाठवाव्यात अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।६।१९५६ **कृ. ना. फडके** } कार्यवाह
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** }

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें
अंक दहावा

# नवभारत

जुलै
१९५६

संचालक : **श्री. शंकरराव देव**

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**–श्री. **हरि कृष्ण मोहनी**–प्रा. **गोवर्धन पारीख**

प्रा. **वि. म. वेडेकर** का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून प्रा. **वि. म. बेडेकर** यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**९०६ शिवाजी नगर, पुणें ४**

**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )**






## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षीं यापूर्वीं त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.—— का. सं. ]

**श्री. म. वि. भिडे** आय्. सी. एस्. ( सेवानिवृत्त ) – पुणें.

**श्री. लीला द. गोळे** एम्. ए. – पुणें विद्यापीठांत पीएच्. डी. करितां अभ्यास करीत आहेत.

**श्री. राजा मंगळवेढेकर** – पुणें येथून निघणाऱ्या ' भूदान-यज्ञ ' या साप्ताहिकाच्या कार्यालयांतील एक कार्यकर्ते.

**प्रा. भ. प्र. मोहरीर** – अमरावती येथील कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्री. सोपानदेव चौधरी** ( नासिक ) – ' काव्यकेतकी ', ' अनुपमा ' या काव्यसंग्रहांचे लेखक.

**प्रा. म. वा. वेलगे** एम्. कॉम्. – वर्धा येथील गो. से. वाणिज्य महाविद्यालयांत अर्थशास्त्राचे प्राध्यापक. ' वाणिज्य अधिनियम व सन्नियमांचा अभ्यास ' या व्यापारी कायद्यावरील पुस्तकाचे लेखक.

**प्रा. गं. बा. सरदार** – पुणें येथील ना. दा. ठा. वुमेन्स कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. ' महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी ', ' संतवाङ्मयाची फलश्रुति ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. व. भ. कर्णिक** – ( मुंबई ) ' Freedom First ' या मुंबईहून निघणाऱ्या मासिक पत्रिकेचे संपादक. ' रॅडिकल ह्युमॅनिस्ट मूव्हमेंट'चे कार्यकर्ते. ' ध्रुवाचा अस्त ' या अनुवादित कादंबरीचे लेखक.

**श्री. ज. स. करंदीकर** – ( पुणें ) – ' केसरी'चे एक विश्वस्त व माजी संपादक. ' गीतातत्त्वमंजरी'चे लेखक.

**श्री. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर** – पुणें येथील टिळक विद्यापीठाच्या संस्कृत महाविद्यालयांत अध्यापक.

**प्रा. शं. वा. ऊर्फ सोनोपंत दांडेकर** ( पुणें ) – स. प. कॉलेजचे माजी प्राचार्य. संतवाङ्मयाचे सुप्रसिद्ध तज्ज्ञ.

**श्री. स. शि. भावे** एम्. ए. – पुणें येथें एल्‌एल्. बी. करितां अभ्यास करीत आहेत. ' मौज ' ' सत्यकथा ' यांमधून यांचें लेखन प्रसिद्ध झालें आहे.

---

चुकीची दुरुस्ती

गेल्या अंकांत लेखकपरिचयांत श्री. सुधा पटवर्धन यांचा परिचय देतांना बी. एस्सी. असें चुकीनें म्हटलें आहे. त्या मानसशास्त्र व राज्यशास्त्र हे विषय घेऊन १९५५ सालीं पुणें विद्यापीठाच्या एम्. ए. झालेल्या आहेत. – का. सं.



अनुक्रमणिका

श्री. दुर्गा भागवत

# देवत्वाचा उगम

परंपरेंत देवत्वाचा उगम मानवांतूनच कसा होतो हें ग्रामदेवतांचा इतिहास पाहिल्यास सहज कळून येण्यासारखें आहे. देव ही भुतांची देणगी होय हें अधिक स्पष्ट होतें. मध्यप्रदेशांत हिंडतांना गोंड, बैगा, भरिया वगैरे अनेक जातींच्या देवदेवतांची मी जी छाननी केली त्यावरून त्या त्या जातींतले पहिले पूर्वज किंवा कांहीं महापराक्रमी पूर्वज देवपदवीला जाऊन पोंचले असें दिसून येतें. या बाबतींत गोंडांच्या बडादेवाची परंपरा उद्बोधक आहे. ती अशी, बडादेव :- बडादेव म्हणजे मोठा देव. हा गोंडांचा सर्वांत मोठा देव. गोंड ही मध्यप्रदेशांतली सर्वांत मोठी आदिवासी जात. मध्यप्रदेश हा भारतांतला असा भाग आहे कीं तिथें वेगवेगळया प्रादेशिक संस्कृतींचें एकीकरण झालेलें आढळतें. वैदिक संस्कृतीचा प्रभावहि या भागांत अतिशय आहे. या सर्वांचा परिणाम बडादेवावरहि झालेला आढळून येतो. कधीं कधीं त्याचें एकीकरण परमपुरुषाशीं करण्यांत येतें, तर कधीं परमपुरुषानें उत्पन्न केलेला पहिला देव किंवा मानव अशी त्याची गणना होते. कधीं तो सूर्यदेव झालेला दिसतो, तर कधीं गृहदेव. कुणी त्याला गोंडांचा पहिला कुलपुरुष म्हणून संबोधतात. बडादेवाची परंपरा बारकाईनें अभ्यासिल्यास, गोंडासारख्या आदिवासी लोकांची धार्मिक मनोवृत्ति व संस्कृति किती गूढ आणि गुंतागुंतीची आहे हें सहज कळून येतें. बडा देव किंवा बुढादेव हा गोंडी देवांत सर्वांत महत्वाचा देव आहे. गोंडी देवायतन हें ठिकठिकाणीं वेगळें असतें, अत्यंत विस्कळित असतें. पण या देवायतनांत बुढादेवाचें नांव कुठेंहि गाळण्यांत येत नाहीं. मध्यप्रदेशांतले गोंड तर राहोतच पण सिंगभूम आणि बंगालमधले गोंडहि त्याला मानतात.

आदिवासींचा आंतरजातीय देव म्हणूनहि बडादेवाचें स्थान महत्त्वाचें आहे. गोंडांशिवाय बैगा, आगरिया, परधान, ओझा, मझवार, सवर, सदिस, मारिया, घसिया, हळबा, गोवारी, भरिया, देवार, धनुदार आणि खोंड या जाती त्याला मानतात. मध्यप्रदेशाबाहेरच्या मिर्झापुरांत खरवार आणि ओरिसांतले खोंड व खरियाहि त्याला आपला प्रमुख देव मानतात. या बाबतींत एकच देव त्याची बरोबरी करूं शकतो. तो म्हणजे ठाकुरदेव किंवा नारायणदेव. मध्यप्रदेशांत त्याचप्रमाणें ओरिसा, छोटानागपूर, मिर्झापूर वगैरे ठिकाणीं आदिवासी जमाती त्याला मानतात. कोरकु लोक नारायण-देवाला सूर्य म्हणतात. भरिया व मवेशी देखील सूर्याला नारायण म्हणून पूजतात.

## बडादेवाचीं विविध नांवें

(१) चांदा जिल्ह्यांत बुढादेवाला फारसापेन किंवा फारशीपेन[1] असें नांव आहे. देवगढ आणि नागपूरच्या आसमंतांतहि हेंच नांव उपलब्ध आहे.[2] फारशी पेन म्हणजे परशुदेव; हा युद्धदेव आहे यांत शंका नाहीं.

(२) भंडारा जिल्ह्यांत त्याला गगरादेव (घंटेचा देव) म्हणतात, आणि शिवणींत त्याला सालेगागरा (सांखळी किंवा कडें आणि घंटेचा देव) म्हणतात..[3]

(३) बस्तारमध्यें मारिया गोंडांत व इतरहि गोंडांत त्याला भेरा पेन म्हणतात.[4].

(४) मंडला जिल्ह्यांतले गोंड व परधान त्याला

---

१ Hislop, '**Aboriginal Tribes in the Central Provinces**', ( Appendix V ).

२ कित्ता, ( Appendix, I, iv. )

३ कित्ता, ( Appendix I, iv and. iii )

४ Grigson, **The Maria Gonds of Bastar** p. 194. ग्रिगसनच्या मताप्रमाणें बरा ( बडा ) किंवा बुढा हीं भेरा या गोंडी शब्दाचीं हिंदी विकृत रूपें आहेत. परंतु ग्रिगसननें भेरा या शब्दाचा अर्थ देण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. भेरा हें विशेषनाम एवढेंच त्यानें अभिप्रेत धरलेलें दिसतें.

प्रेमनारायण म्हणतात.

(५) छिंदवाडा, बालाघाट, नागपूर, व विशेषतः सागर व जिथें जिथें वैदिक व पौराणिक संस्कृतीचा प्रभाव प्रकर्षानें आढळून येतो तिथें त्याला महादेव म्हणतात, असें मला आढळून आलें.

(६) मिर्झापुरांत त्याला निंगो[५] किंवा निंगो बधिर्यां मझवार लोक म्हणतात. ओरिसांतले गोंड व तत्सम आदिवासी त्याला बडियाल पेन म्हणतात. बडियालची पूजा सिंगभूमपर्यंत पसरलेली आहे.[७] सरगुजामध्यें त्याला बरिया साद म्हणतात. हा रकसेल छत्री नांवाचा सरगुजाचा राजा होता असें म्हणतात.

(७) छोटानागपुरांत, खरिया, उरावण, मालेर व खोंड लोक त्याला बिरी, बेरो, बेर, बेरो गोसाइन आणि बेरुपेन्नु या नांवांनीं ओळखतात.

(८) ओरिसांतले खोंड त्याला बुरा पेन्नु म्हणजे सूर्य देव म्हणतात. सिंगभूमचे कचरी लोक देखील बुरा महादेव आणि बुरा गोसाईन या दोन देवांचा समावेश आपल्या देवतायतनांत करतात.

### बडादेवाच्या आख्यायिका

बडादेव, बरादेव किंवा बुडादेवासंबंधीं आख्यायिका फार दुर्मीळ आहेत. मिळतात त्या तुकड्यांच्या स्वरूपांत व परस्परविरोधी अशा. या आख्यायिकांत प्रेमनारायणाची मला मिळालेली कथा महत्त्वाची आहे ती अशी : महादेवानें हाताच्या फोडांतून दोन पुरुष निर्माण केले, रैताल व बरियर. हे दोघे भाऊ गोंडांचे आदिपूर्वज समजले जातात. आपण कुणाला पुजावें, आपलें संरक्षण कोण करील ही त्यांना चिंता पडली. ते महादेवाला म्हणाले, " आमचा देव कोण ? आम्ही कुणाची पूजा करायची ?" महादेव म्हणाला : "कैलासपर्वतावर जा. तिथें प्रेमनारायण तुम्हाला दिसेल. त्याची पूजा करा."

तें दोघे भाऊ कैलासपर्वतावर गेले. पण तिथें त्यांना देव दिसला नाहीं. निराश होऊन ते एका साजाच्या झाडाखालीं बसले. त्या झाडांतून प्रेमनारायण बाहेर आला आणि म्हणाला " तुम्ही कोण ?"

रैताळ व बरियरनीं आपली सारी कहाणी त्याला सांगितली. ती ऐकून प्रेमनारायण म्हणाला, "ज्याला तुम्ही शोधतां तो मीच."

ते दोघे आनंदले. " देवा, तुझी पूजा आम्ही कशी करावी " ? त्यांनीं विचारलें.

" माझ्या साऱ्या सेवकांना रक्त व मांस या खेरीज दुसरें कांहीं चालत नाहीं. तें तुम्ही देत असाल तर माझी पूजा करा. जा आता. घरीं जा व शेती करा."

मग त्या भावांनीं जंगलांतलीं झाडें तोडून जाळून, जमीन तयार केली. पण त्यांच्याजवळ बीं नव्हतें. परत ते दोघे प्रेमनारायणाकडे आले.

प्रेमनारायण म्हणाला " पाताळांत नागदेव आहे, त्याच्याकडे जा; तो तुम्हाला बीं देईल."

ते भाऊ सात समुद्र ओलांडून, सोळा द्वीपें ओलांडून शेंवरीच्या झाडाच्या ढोलींतून पाताळांत उतरले, व त्यांनीं नागदेवाला " बीं दे " म्हणून विनविलें. पण नागदेवानें त्यांना हांकलून दिलें. फिरून ते भाऊ प्रेमनारायणाकडे आले व त्यांनीं त्याला घडलेली हकिगत सांगितली. मग प्रेमनारायण स्वतः पाताळांत गेला आणि नागदेवाला त्यानें " अन्नदेव कुठें आहे ?" म्हणून विचारलें. नागदेव म्हणाला " माझ्याजवळ धान्य नाहीं."

तें ऐकून प्रेमनारायण म्हणाला " मग माणसें अन्नावांचून कशीं जगतील ? मला अन्नदेव कुठें आहे तें दाखव."

मग नागदेव म्हणाला ' बनबसु जंगलांत मोंडी नांवाची डुकरीण आहे. तिनें सारें धान्य खाऊन टाकलें आहे.

५ The Gazetteer of the United provinces, Mirzapur p. 102
६ Crooke, The Tribes and Castes of and N. W. P. 3135 Oudh III.
७ Dalton, The Descriptive Ethnology of Bengal p. p. 278, 281.
८ Crooke, वर उल्लिखित ग्रंथ ( P. 437 )
९ Roy, The Khariyas, P. 321
१० Dalton, वर उल्लेखिलेला ग्रंथ, ( P. 297 )
११ Endle, The Kacharis, P. 38.



अनुक्रमणिका






अन्नदेव काशीच्या डोमारराजाकडे पळून गेला आहे. ”

मग रेताल व बरियर काशीला डोमार राजाकडे गेले. प्रेमनारायणानें आपली जादू डोंबराजावर घातली. शहरांतलीं सारीं डुकरें मरूं लागलीं. डोंबराजाला काळजी पडली. ’ असें कां झालें? हें विचारण्यासाठीं तो नंगा बैगाकडे गेला. नंगा बैगानें “प्रेमनारायणाचा हा प्रभाव आहे. अन्नदेवाला परत दे नाहींतर सारीं डुकरें मरतील ” असें सांगितलें. “ मला कुणींच दिसत नाहीं. मी धान्य कुणाला देऊं? ” डोंबराजा म्हणाला.

नंगा बैगा म्हणाला “ साजाच्या झाडाखालीं पसाभर धान्य ठेव आणि परत ये ”

डोंबराजानें धान्य ठेवलें व मग डुकरें मरेनाशीं झालीं.

प्रेमनारायणानें तें धान्य त्या गोंडबंधूना दिलें. “ हें शेतात पेरा. मला तांबडा बकरा, धरतीमातेला काळा बकरा द्या. डुकर व तांबडा कोंबडा अन्नदेवाला द्या. तपकिरी कोंबडा आणि डुकर नारायणदेवाला आणि नंगा बैगाला व त्याच्या बायकोला डुकर अर्पण करा ” तो म्हणाला.

तीन वर्षांनीं धान्य पिकून तयार झालें. मग ते भाऊ मोंडी डुकरिणीकडे गेले आणि तिच्यापासून दोन डुकरें घेऊन आले.

नंगा बैगाकडून त्यांनीं बकरे व कोंबडे आणले.

मग सर्व नागवंशी व राजवंशी गोंडांना त्यांनीं नव्या धान्याच्या भोजनाचें आमंत्रण दिलें. पशुबळींना धान्य खाऊं घातलें. पण प्रेमनारायणाचा बोकड धान्य खाईना, “काय करावें? ” अशी चिंता त्या दोघां भावांना फिरून पडली. मग त्यांनीं बांबू चिरला. घोड्याचा केंस काढून बांबूची एकतारी केली व ती वाजवूं लागले. या संगीतानें प्रेमनारायण खूष झाला. बोकडानें धान्य खाल्लें. मग प्रेमनारायण एका गोंडाच्या शरीरांत शिरला व म्हणाला “ माझी पूजा साजाच्या झाडाखालीं करा. मला बुढादेव म्हणा. जेव्हां कुटुंबांत कुणी मरेल त्या वेळीं वाद्यें वाजवा आणि मृताला उद्देशून म्हणा ‘ तुला आतां बुढादेव भेटेल. तीन वर्षांनीं फिरून आमच्यांत ये. ’ ”

या कथेंतला महादेवाचा उल्लेख, आणि देव त्या भावांकडून पूजा करण्यासाठीं जणूं थांबूनच कांहीं राहिला आहे, हा भाग यावरून, ही कथा बरीच अर्वाचीन असल्याचें दाखवतात. प्रेमनारायण हें नांवहि गोंडनांव नाहीं. नारायण व प्रेमनारायण हे दोन वेगळे देव आहेत. नारायण देव हा गोंडांत उंबरठ्याचा व चुलीचा देव समजतात. त्याला डुकर बळी लागतो. या कथेंतला बोकडाचा उल्लेखहि हिंदु वळणाचा आहे. बुढादेवाचा खरा बळी म्हणजे कालवड.

बिलासपूरच्या गोंडांत दुसरी एक कथा प्रचलित आहे ती अशी. भगवानानें प्रथम जे गोंड तयार केले, त्यांत बरियर सर्वांत बलवान् होता. तो वृद्ध होऊन मेला. त्याला साजाच्या झाडाखालीं पुरलें. त्याचा आत्मा साजावर गेला. त्यालाच बुढाल पेन किंवा बुढादेव असें लोक म्हणूं लागले. तेव्हांपासून मृताची अंत्येष्टि साजाच्या झाडाखालीं करण्याचा प्रघात पडला.

दुसरी एक रायपुर जिल्ह्यांतली कहाणी आहे, तिच्यांत असें म्हटलें आहे कीं, एका वृद्ध गोंडराजानें मरतांना ‘ माझी पूजा करा ’ असें प्रजेस सांगितलें. त्यामुळें तोच त्यांचा पहिला देव झाला.[१२]

बरियरच्या वर दिलेल्या कथेंत बरियर हा प्रेमनारायणाचा उपासक होण्याऐवजीं स्वतःच देवत्व पावलेला दिसतो आहे. पहिल्या कहाणींतला असंदिग्ध भाग असा. प्रेमनारायण ज्या गोंडाच्या तोंडून बोलला, त्याचें नांव दिलेलें नाहीं. हाच बरियर असावा. मेल्यानंतर त्याला बुढादेव म्हणण्याची प्रथा पडली असावी. सरगुजाची बरियर सादेची कथाहि, बरियरच बुढादेव झाल्याचें सांगते.

निंगो हा मझवारांचा मुख्य देव. बघिया हें वाघानें मारलेल्या व नंतर देवत्व पावलेल्या माणसाचें विशेषण. ‘ निंगो बघिया ’ या मिर्झापुरांतल्या नांवावरून निंगोच वाघानें मारल्यामुळें देव झाला असावा असें वाटतें. परंतु कांहींच्या मतें बघिया हा निंगोचा पहारेकरी आहे. सारांश काय कीं ‘ वीरपूजा ’ किंवा ‘ विभूतिपूजा ’ हें बडादेवाच्या कहाण्यांचें वैशिष्ट्य आहे.

फारसापेनाची एक मोडकी-तोडकी कहाणी एका तोडग्यांत अंतर्भूत आहे. ती अशी : “ फारसापेननें आपले भाऊ सुभद्र, कुभद्र व लिंगोभान परियार यांना परतून मारलें. कुटुंबांतल्या सोळा स्त्रियांनीं, फारसा-

१२ Raipur District Gazetteer, P. 107.










पेनची आई, भावांच्या तीन बायका व त्यांच्या बारा मुली यांनीं आत्महत्या केली.[१३] या भयंकर हत्येचें कारण काय तें कळत नाहीं. या कृतीवरूनच फारसापेन हें नांव मारणारला पडलें. या बाबतींत मंको रैताल त्याचा साथीदार होता. या कथेवरूनहि फारसापेन मनुष्यच होता हें सिद्ध होतें.

मंडला जिल्ह्यांत एक कथा प्रचलित आहे ती अशी कीं, बडादेव अन्नदाईबरोबर ( अन्नदेवतेबरोबर ) चांभाराच्या पोटांत रहात होता. तिच्याबरोबरच चांभाराचें पोट फाडून तो बाहेर आला.[१४] दुसरी एक कथा अशी कीं एका रावट स्त्रीचा अनैतिक संबंध एका गोंड जातीच्या माणसाशीं झाला. त्या स्त्रीला मुलगा झाला. त्या मुलाला त्या दोघांनीं जिवंत पुरलें. त्या मुलाचें पिशाच्च झालें. तो गोंड त्यालाच देव मानून पुजूं लागला. त्याचें नांव त्यानें बडादेव ठेवलें.[१५]

### गोंडांच्या उत्पत्ति-कथांतील बडादेव

जगदुत्पत्तीच्या कथांवरून किंवा लिंगोच्या जुन्या गाण्यावरून, बडादेवानें जगदुत्पत्तीच्या कार्यांत महादेव ( भगवान् ), लोहगंडी, भीमसेन, पवनदसेरी, लोहासुर, अग्यासुर, नंगा बैगा यांच्याप्रमाणें कुठलाच भाग घेतलेला दिसून येत नाहीं. फक्त एका बैगा कथेंत त्यानें या प्रसंगीं जें कार्य केलें त्याचा उल्लेख आहे. तो असा :

जेव्हां भगवानानें पाहिलें कीं भीमसेनाला पृथ्वी ठोकून स्थिर करतां येत नाहीं, तेव्हां त्यानें कावळयाला पाठवून दोन बैगांना बोलावलें. तो कावळा उडत उडत दूर गेला. त्याला नंगा बैगाच्या विस्तवाचा धूर दिसला. हें कांहीं तरी भक्ष्य असावें म्हणून तो धूर पकडण्यासाठीं कावळा त्याच्या मागें धांवला, व त्या साजाच्या झाडाशीं आला. त्याला नंगा बैगानें पकडण्याचा प्रयत्न केला. इतक्यांत बडा देव झाडावरून बैगाला म्हणाला : "त्याला उपद्रव देऊं नको. तो भगवानाकडून आला आहे." हें ऐकून नंगा बैगानें कावळयाला मांडीवर बसवलें व ममतेनें थोपटलें.[१६] या कथेंत मनुष्यजात उत्पन्न व्हायच्या सुमाराला बडादेव अस्तित्वांत होता एवढेंच सूचित होतें.

कांहीं बिलासपूर व मंडला इथले गोंड म्हणतात कीं श्रियाल जंगू ही बडादेवाची बायको आहे.[१७] श्रियाळ जंगूलाच छत्तिसगढांत रातमाई म्हणतात. रातमाई ही रात्रीची देवता असून ती मुलांना सुखवते.[१८] ती बुढादेवाप्रमाणेंच सौम्य स्वभावाची असून माणसें आपलीं मुलेंच आहेत अशा तऱ्हेनें वागत असते. बडादेवाप्रमाणें रैतालला ( रयताल किंवा रखल्याल ) व बरियर यांच्यावर तिनें मेहेरनजर केली होती. एकदां गोंडांत आजाराची सांथ झाली. कोणत्या देवाच्या अवकृपेनें रोगराई झाली हें लोकांना समजेना. त्यावेळीं श्रियाल जंगू रैताल व बरियर यांच्या स्वप्नांत आली व म्हणाली : "माघाच्या कृष्णपक्षांत माझी पूजा करा व मला रातमाई म्हणा, म्हणजें हें अरिष्ट दूर होईल." तेव्हांपासून गोंडांचें रक्षण ती मोठ्या ममतेनें करीत असते.

बडादेवाचा सेवक मटियादेव ( वावटळीचा देव ) आहे असें शिवणी व मिर्झापुरांतल्या कथांत दिसून येतें.[१९] वर दिलेल्या सर्व कथांचा सारांश काढला

१३ Hislop. वर उल्लेखिलेला ग्रंथ, ( Appendix I iv. ) या कथेचें परशुरामाच्या कथेंशीं असलेलें साम्य गमतीचें आहे. परशुराम मातेला मारतो तर इथें माता आत्महत्या करते.

१४ Elwin, The Baiga, P. 57.

१५ Russel and Hiralal, '**Tribes and Castes of the Central Provinces**' IV, p. 355.

१६ Elwin. वर उल्लिखित ग्रंथ ( P. 314 ).

१७ कित्ता P. 60.

१८ लिंगोच्या एका गाण्यांत गोंड देवांची यादी दिली आहे. त्यांपैकीं जंगो रयताल एक आहे. हीच तर श्रियाळ जंगू नसेल ? ( Hislop, वर उल्लेखिलेला ग्रंथ part I; Forsyth, **High-Lands of Central India** p. 190 ).

१९ Hislop. उपरिनिर्दिष्ट ग्रंथ ( Appendix III ).










तर वडादेव हा मूळचा मनुष्य असून मृत्यूनंतर त्याच्या आत्म्याला किंवा पिशाचाला देवत्व आलें असेंच आढळून येतें. भारतांतल्या पुष्कळशा ग्रामदेवतांचा इतिहास पाहिला, तर मानवाचें पिशाच व पिशाचाचें दैवतीकरण व्हायचें, हें जणुं ठरूनच गेल्यासारखें दिसतें.

### पहिला मानवी देव इंद्र

मृत्यूचें गूढ धर्माचाराचा पाया आहे हें आपण पाहिलें; त्याचप्रमाणें बडा देवाचें उदाहरण मृत पराक्रमी पूर्वज देवत्वाला, कसा पोचतों हेंहि आपण पाहिलें. हें उदाहरण त्यांत अनेक स्थानिक प्रथांची गुंतागुंत कशी झालेली असते हें दाखविण्यासाठींच केवळ मी निवडलें. वस्तुतः वेदवाङ्मयांतला इंद्रहि याच प्रकारें देवत्व पावलेला वीर आहे. एवढेंच नाहीं तर इंद्र हा केवळ वैदिक भारतीयांचाच वीरपुरुष व देव आहे. इंद्र ही देवता आर्यांच्या म्हणजे यूरो-भारतीयांच्या देवतांपैकीं नव्हे. यूरो-भारतीय देवांत, वरुण, भीम वगैरे देवतांचा समावेश होतो तसा इंद्राचा होत नाहीं. 'इंद्र हा आक्रमणशील वैदिक भारतीयांचा नेता–त्यांचा राष्ट्रीय वीर, त्यांची सर्वश्रेष्ठ राष्ट्रीय देवता'. इंद्रानें वरुणाला पदच्युत केलें. इंद्राच्या व्यक्तित्वाचें विश्लेषण डॉ. रा. ना. दांडेकरांनीं अतिशय समर्पक रीतीनें केलें आहे.[२०] ते म्हणतात : "एखाद्या मानवी वीराला देवत्व प्राप्त होतें अशा घटनेच्या पहिल्या अवस्थेंत त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत मानवी अंशांचें प्राधान्य कायम राहतें. पण पुढें पुढें मानवी अंश मागें पडून, ज्यांना वैश्विक (cosmic) म्हणतां येईल असे अंश त्या देवतेच्या व्यक्तिमत्त्वांत समाविष्ट केले जातात. 'वृत्रहा' इंद्र हा प्रथम मानवी 'वृत्रां'चा निःपातकर्ता होता. त्यालाच पुढें वैदिक कवींनीं Cosmic–निसर्गांतील 'वृत्रां'चा निःपातकर्ता बनविलें. इंद्राच्या व्यक्तिमत्त्वांत पर्जन्यदेवतेचे कांहीं अंश दिसून येतात त्याचें कारण हेंच. मानवी वीर इंद्र हा पर्जन्यदेवता समजला गेल्यावर त्यानें मूळच्या पर्जन्यदेवतेला – त्रित आत्म्याला – स्थानभ्रष्ट करावें हें ओघानेंच प्राप्त होतें." इंद्राचें मरुतांशीं सख्य हें रुद्र या मूळच्या मृत्युदेवतेचे अंश इंद्राला चिकटवल्यामुळें उत्पन्न झालें आहे. याप्रमाणें इंद्र या मूळ भारतीय वीराला सिंधुखोऱ्यांतील 'पुर' वासी जनांशीं युद्ध करावें लागलें, म्हणून तो पुरंदर ठरला. इंद्राचे सारे पराक्रम इतरांच्या साहाय्यावांचून पार पडल्यानें त्याचें माहात्म्य वैदिक भारतीयांना निःसंशय मोलाचें वाटलें. इंद्रामुळेंच वैदिकांची प्रथम वसाहत सिंधुखोऱ्यांत झाली, आणि वेदवाङ्मयाचा मध्यबिंदु इंद्रकथा झाल्या.

---

### नयन तुझे मज गमे सरोवर !

"सरोवराच्या तीरीं सुंदर
उभे राहुनी दोघे आपण
शोभा बघतां मधें थांबुनी
नयन रोखिशी मजवर तूं पण !"

"नयन तुझे मज गमे सरोवर
मीन–पंक्ति कधिं उसळति चंचल
कधीं बिलोरी नील शांतता
कधीं भावना विलसति कोमल

कधीं उषेच्या छटाच सुंदर
अनुरागाच्या दिसती मोहक
बिंबित होते रम्य चंद्रिका
कधीं स्मिताची शीतल लाडिक

लाल अधर तो असा मुरडुनी
कृष्ण तारका नयनीं त्या चल
रोधुनि धरिशी एका कोनीं
दिसशी मोहक हसतां मिष्किल"

— विश्वनाथ के. महाबळेश्वरकर

२० रा. ना. दांडेकर, वैदिक देवतांचें अभिनव-दर्शन, पृ. १०२–३.

श्री. म. वि. भिडे

# ॲलन कारडेक् व परलोक-संशोधन

ॲलन कारडेक् हें नांव आज बहुतेकांना अपरिचित वाटेल. परंतु शंभर वर्षांपूर्वी हें युरोपमध्यें सुप्रसिद्ध झालेलें होतें. त्याचें कारण म्हणजे ॲलन कारडेक् ह्यांनीं प्रसिद्ध केलेला "The Book of Spirits." किंवा 'मृतात्म्यांचा ग्रंथ' ह्या नांवांचा ग्रंथ होय. बहुतेक धर्मांमध्यें मनुष्याचा आत्मा अमर आहे व मृत्यूनंतर तो स्वर्ग, नरक वगैरेसारख्या ठिकाणीं त्याच्या पापपुण्याचीं फळें भोगण्यास जातो असें सांगितलेलें आहे. कांहीं धर्मांचे शिकवणुकीप्रमाणें पापपुण्याचीं फळें कांहीं काळ भोगल्यानंतर मनुष्याला पुनः पृथ्वीवर जन्म घ्यावा लागतो व संपूर्णपणें कर्मनाश होईतोंपर्यंत तो जन्म-मृत्यूंच्या फेऱ्यांत सांपडलेला असतो. परंतु अठराव्या शतकांमध्यें बुद्धिवादाला प्राधान्य मिळाल्यापासून पुष्कळ लोक वरील प्रकारच्या धर्माच्या शिकवणुकीबद्दल साशंक असतात. बुद्धिवादी लोकांना बुद्धीला पटेल असा कांहींतरी प्रत्यक्ष पुरावा पाहिजे असतो. अशा प्रकारचा पुरावा मिळविण्याचा प्रयत्न गेल्या शंभर वर्षांत परलोकविद्येचें जें संशोधन युरोप व अमेरिकेमध्यें चाललें आहे त्यामध्यें केलेला आहे. 'परलोकविद्या' म्हणजे मृत्यूनंतर इहलोक सोडून गेलेल्या माणसांशीं कोणत्या ना कोणत्या प्रकारें संबंध जोडून त्यांचेपासून त्यांच्या स्थितीविषयीं व शक्य ती इतरही माहिती मिळवण्याचा प्रयत्न करणें असें थोडक्यांत म्हणतां येईल.

### एका अद्भुत चमत्काराच्या संशोधनानें प्रारंभ

प्रत्येक देशामध्यें भुताटकीचे प्रकाराबद्दल निरनिराळ्या कल्पना व अनुभव फार प्राचीन काळापासून ऐकिवांत आहेत. परंतु ह्या विषयाचा आधुनिक शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास गेल्या शंभर वर्षांपूर्वीं झाला होता असें दिसत नाहीं. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं ह्या प्रश्नाला एका अद्भुत चमत्कारानें प्रथम विशेष चालना मिळाली. सन १८४८ मध्यें अमेरिकेमध्यें हायडेस्व्हिल् ह्या गांवीं 'फाक्स' ह्या उपनांवाचें कुटुंब रहात असे. त्या गांवामध्यें एका घरांत भुताटकीचे प्रकार होतात अशी समजूत होती. त्या घरांत हें कुटुंब राहण्यास गेल्यानंतर लौकरच तेथें भुताटकीचे प्रकार अनुभवास येऊं लागले. दारावर किंवा टेबलावर ठोके किंवा थाप मारल्याप्रमाणें आवाज होणें, जड वस्तु आपसुक इकडे-तिकडे हलणें, निरनिराळे आवाज होणें वगैरे चमत्कारिक प्रकार घडूं लागले. घरांतील मुलांना ह्या प्रकाराची मौज वाटत असे. एके दिवशीं ह्या मुलांपैकीं एका मुलीनें त्या भुतांची परीक्षा पहाण्याचें मनांत आणलें. टेबलावर जेव्हां ठोके ऐकूं येऊं लागले, तेव्हां त्या मुलीनेंसुद्धां टेबलावर ठोके देण्यास सुरवात केली व भुताला सांगितलें कीं, "मी जितके ठोके देतें तितकेच तूंपण माझ्यामागून दे. म्हणजे मी एक ठोका दिला कीं तूंपण एक दे, दोन दिले कीं दोन दे. चार दिले कीं चार-असें अनुकरण कर." ह्याप्रमाणें सांगितल्यावर भुतानें तिच्या ठोक्याइतके बरोबर ठोके दिले. दुसऱ्या मुलीनें असाच प्रयोग केला. तोहि यशस्वी ठरला. तेव्हां त्यांची आई मिसेस् फॉक्स हिनें पण असाच एक प्रयोग करावयाचें ठरविलें. तिनें त्या भुताला सांगितलें कीं "मी विचारीन त्या मुलाचें वय असेल तितके तूं ठोके दे." त्याप्रमाणें केलें. तेव्हां भुतानें मुलांच्या वयाइतके ठोके देऊन त्यांचीं वयें बरोबर सांगितलीं: ह्या प्रयोगामुळें ह्या कुटुंबांतील माणसांची जिज्ञासा वाढली व त्यांनीं त्या भुतांकडून त्याचा आत्मवृत्तान्त समजून घेण्याचा प्रयत्न करण्याचें ठरविलें, व त्या

'I tell you we do persist. Communication is possible. I have proved that the people who communicate are who and what they are. The conclusion is that survival is scientifically proved by scientific investigation" – Sir Oliver Lodge F. R. S.



अनुक्रमणिका

करितां एक विशिष्ट कोड किंवा संकेत योजिला. उदाहरणार्थ ' A ' ह्या अक्षराला एक ठोका, ' B ' ह्या अक्षराला दोन ठोके वगैरे – असे दर अक्षराला ठोके ठरवले व त्याप्रमाणें भुताला समजावून सांगून व नंतर प्रश्न विचारून त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास त्यांस सांगितलें. ह्या प्रश्नोत्तरांना अर्थात् पुष्कळ अवधि लागला. कारण प्रत्येक अक्षराचे ठोके नीट मोजणें, शब्द तोडणें, वाक्य संपविणें वगैरे सर्व गोष्टी ठोक्यांचे प्रयोगानें नीट समजून घेणें हें पुष्कळच श्रमाचें काम होतें. तथापि तें काम त्या कुटुंब्रांतील मंडळींनीं चिकाटीनें केलें व भुतांचा पूर्ववृत्तान्त समजून घेतला. त्यावरून असें कळलें कीं तें भूत म्हणजे त्या घरांत पूर्वी रहात असलेल्या एका माणसाचें, त्याचे घरीं आलेल्या एका पांथस्थाचा खून केला होता त्या पांथस्थाचें होतें. त्या भुतानें खुनाची सर्व हकीकत सांगितली व त्याचें प्रेत त्या घरांतच पुरून टाकलें होतें, ती जागा पण सांगितली. त्या जागीं खणल्यावर तेथें माणसाचा सांगाडा व हाडें सांपडलीं ! त्यानें सांगितलेल्या इतर माहितीची पण चवकशी करतां पुरावा मिळाला. ह्या हकीगतीमुळें त्या गांवांत पुष्कळच खळबळ उडाली व इतरत्र पण ह्या गोष्टीची चर्चा सुरू होऊन असल्या भुताटकीच्या प्रकारांची छाननी करून भुतें म्हणजे मृतात्मे ह्यांचेसंबंधीं विश्वसनीय माहिती मिळविण्याकरितां पुष्कळ प्रयोग होऊं लागले. ह्या प्रयोगाची प्रसिद्धि लवकरच युरोपांतहि झाली. युरोपांतहि पुष्कळ लोक असले प्रयोग करूं लागले. अशाच प्रकारच्या प्रयोगांमधून ' ॲलन कारडेक् ' ह्यांनीं लिहिलेल्या ' The Book of Spirits ' ह्याची उत्पत्ति झाली.

## ॲलन कारडेक् यांचें संशोधन

' ॲलन कारडेक् ' हें वस्तुतः टोपण नांव आहे. हे गृहस्थ मूळ फ्रान्सदेशचे रहिवासी असून त्यांचें खरें नांव Leon-Denizarth-Hippolyte Rivail असें होतें. हें नांव बरेंच अवजड असल्यामुळें ह्या लेखांत त्यांना आपण ॲलन कारडेकच म्हणूं. हे गृहस्थ लहानपणापासून स्वतंत्र विचाराचे, चिकित्सक व संशोधक वृत्तीचे होते. त्यांनीं शिक्षणविषयाचा अभ्यास करून बरींच पुस्तकें त्या विषयांवर लिहिलीं. निरनिराळया शास्त्रीय विषयांवर ते व्याख्यानें देत व त्याला श्रोतृवृंद जमत असे. सन १८५० चे सुमारास त्यांचें लक्ष वर उल्लेखिलेले मृतात्म्यांच्या संबंधींचे जे प्रयोग होऊं लागले होते, त्यांकडे गेलें. त्यांचे एका स्नेह्याला २ मुली होत्या. त्यांच्यामध्यें इंग्रजींत ज्याला Medium म्हणतात, त्यांचे अंगीं जशा प्रकारची एक शक्ति असते, तशी होती असें आढळून आलें होतें. मृतात्म्यांना आपल्यासारखा जड देह नसल्यामुळें त्यांना इहलोकांतील व्यक्तींशीं संबंध कोणातरी अशा प्रकारच्या विशिष्ट शक्ति असलेल्या व्यक्तीमार्फत जोडावा लागतो. अशा व्यक्तीला इंग्रजींत Medium अशी संज्ञा दिलेली आहे. त्याचें भाषांतर ' मध्यस्थ ' किंवा ' हस्तक ' असें करतां येईल. वरील ' हस्तक ' मुलींचे मार्फत मृतात्म्यांच्या कडून पुष्कळ वेळां निरनिराळया प्रकारचे संदेश येत. पण ते बहुधा त्या मुलींना ज्या विषयाची गोडी होती त्या विषयांसंबंधी असत. ॲलन कारडेक् उपस्थित असले म्हणजे मात्र मृतात्मे त्या मुलींचे मार्फत गंभीर प्रश्नासंबंधी चर्चा करूं लागत. अदृश्य सृष्टींतून ह्या मिळणाऱ्या माहितीचें महत्त्व ॲलन कारडेक् ह्यांचें लक्षांत आलें व त्यासंबंधी स्पष्टीकरणार्थ त्यांनीं प्रश्न विचारतां त्यांना मृतात्म्यांचे कडून अशी माहिती मिळाली कीं गंभीर विषयावर चर्चा करणारे मृतात्मे उच्च कोटींतील व्यक्ती असून, त्यांची अशी इच्छा होती कीं मनुष्यजीवनाचे मूलभूत प्रश्नासंबंधी योग्य माहिती ॲलन कारडेक् ह्यानां देऊन त्यांनीं धर्मजागृतीचें कार्य करावें. हा संदेश ऐकून ॲलन कारडेक् ह्यानां फार आश्चर्य वाटलें. त्यानीं ह्या प्रश्नाबद्दल स्वतःची खात्री करून घेण्याकरितां एक प्रश्नमालिका तयार केली व त्या प्रश्नांचीं मृतात्म्यानीं दिलेलीं उत्तरें ते व्यवस्थित रीतीनें लिहून घेऊं लागले. हीं उत्तरें सुसंबद्ध, बुद्धीला व तर्काला पटण्यासारखीं दिसून आल्यावरून त्यानीं हे प्रयोग चालू ठेवले. त्यांनीं निरनिराळया प्रश्नमालिका तयार करून दर आठवड्यास दोन दिवस त्यांचेसंबंधीं माहिती मृतात्म्याकडून मिळवण्याचा क्रम सुरू केला व तो सतत दोन वर्षें चालवला. ह्या प्रकारें त्यांना मानवी जीविताचे संबंधीं एक ' तत्त्वज्ञान'च उपलब्ध झालें असें म्हणतां येईल. हें तत्त्वज्ञान विचारवंत लोकांना पटण्यासारखें वाटल्यावरून त्यांनीं तें प्रसिद्ध करण्याचें योजिलें. प्रसिद्ध करण्याचे आधीं मृतात्म्यांचा त्यासंबंधीं



अनुक्रमणिका






अभिप्राय घेतला तेव्हां मृतात्म्यानीं असें सांगितलें कीं त्यांनीं सांगितलेल्या तत्त्वज्ञानाची जगामध्यें प्रसिद्धि व्हावी ह्या हेतूनेंच तें त्यानीं सांगितलेलें होतें व म्हणून तें प्रसिद्ध करण्याला लगेच आपली संमति दिली. फक्त एवढेंच सांगितलें कीं हें तत्त्वज्ञान 'मृतात्म्यांकडून उपलब्ध झालेलें आहे. ही गोष्ट स्पष्ट व्हावी म्हणून प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकास 'The Spirits' Book' असें नांव द्यावें व तें 'Allan Kardec' असें टोपण नांवानें प्रसिद्ध करावें. त्याप्रमाणें १८५२ चे सुमारास हें पुस्तक प्रसिद्ध झालें. त्याच्या प्रसिद्धीनंतर त्यांतील विषयासंबंधीं युरोपमधील फ्रान्स व इतर देशांत पुष्कळ चर्चा झाली व पुष्कळांना त्यांतील तत्त्वज्ञान ग्राह्य वाटलें व ते त्याचे अनुयायी बनले. पुष्कळ विद्वान् लोक ॲलन कारडेक् ह्यांच्याशीं ह्या विषयाबद्दल अधिक माहिती मिळविण्यास व चर्चा करण्यास येऊं लागले. फ्रान्सचे बादशाहा तिसरे नेपोलिअन ह्यांनापण त्या विषयाबद्दल कुतूहल उत्पन्न झालें व ते ॲलन कारडेक् ह्यांना ह्या विषयासंबंधीं चर्चा करण्यास बोलावून घेत असत. वरील पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर लवकरच ॲलन कारडेक् ह्यांनीं The Parisian Society of Psychologic Studies ह्या नांवाची संस्था काढली व तिचे ते अध्यक्ष झाले. ते 'La Revue Spirit' म्हणून एक मासिक पण काढीत असून इतर ठिकाणींसुद्धां अशाच प्रकारच्या संस्था व मासिकें निघालीं. ह्या पुस्तकांतील विषयासंबंधीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या लोकांनीं केलेल्या प्रयोगावरून मिळाली. ती सर्व माहिती संकलित करून १८५७ सालीं ॲलन कारडेक् ह्यांनीं ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढली. पुढें हृदयविकारानें ॲलन कारडेक् ह्यांची प्रकृति खालावत चालली. आपलें कार्य चालू रहावें ह्या हेतूनें त्यानीं त्याकरितां एक जॉइंट स्टॉक कंपनी स्थापन करण्याची योजना आंखली. पण तिला मूर्त स्वरूप येण्यापूर्वींच ते ३१ मार्च १८६९ रोजीं हृदयाचे झटक्यानें आपलें काम करीत असतांच अकस्मात् कालवश झाले !

## मृतात्म्यांकडून उपलब्ध झालेलें तत्त्वज्ञान

'The Spirit's Book' हा एक ४०० च्यावर पानांचा विस्तृत ग्रंथ आहे व त्यांत मानवी जीवनाचे मूलभूत प्रश्नांसंबंधी प्रश्नोत्तररूपानें माहिती दिलेली आहे. एकंदर प्रश्नसंख्या १०१९ असून शेवटल्या भागांत थोडक्यांत समारोप केलेला आहे. ह्या पुस्तकाचें महत्त्व कळण्यास तें मुळांतच वाचावयास पाहिजे. हें पुस्तक आतां दुर्मिळ झालेलें आहे. तथापि मोठ्या शहरांतील वाचनालयांतून कदाचित् मिळूं शकेल. त्यांतील तत्त्वज्ञानाची कल्पना यावी म्हणून त्यांतील कांहीं प्रमुख सिद्धांत संक्षेपानें खालीं दिले आहेत.

(१) परमेश्वर एक नित्य, अविकारी, सर्वशक्तिमान्, सत्स्वरूप व न्यायी असा आहे.

(२) त्यानें सर्व विश्व निर्माण केलेलें आहे.

(३) आपणांस दिसतें त्या दृश्य सृष्टीशिवाय अदृश्य सृष्टि आहे. तीच आत्म्यांचें मूळ व नित्याचें निवासस्थान होय.

(४) परमेश्वरानें आत्मे निर्माण केले ते प्रथम निरागस पण ज्ञानरहित असे होते. त्यांना विचार-स्वातंत्र्य व आचार-स्वातंत्र्य दिलेलें होतें.

(५) आत्म्यांना आपला विकास करून पूर्णत्वाप्रत जाण्याकरितां शरीर धारण करून पृथ्वीवर किंवा तत्सदृश जगामध्यें वारंवार जन्म घ्यावा लागतो.

(६) जगामध्यें परिस्थितीला तोंड देऊन आत्म्यांचे अंगीं सद्गुणांची वाढ जसजशी होईल तसतसे ते पूर्णत्वाप्रत जात असतात. एका जन्मांत प्रगति झाली असेल त्यापेक्षां अधिक प्रगति ज्या दिशेनें होणें जरूर असतें त्याला अनुरूप असा दुसरा जन्म आत्म्याला घ्यावा लागतो. अशा प्रकारें क्रमाक्रमानें पूर्णत्वास पोहोंचण्यास आत्म्याला अनेक जन्म घ्यावे लागतात.

(७) स्वर्ग व नरक अशीं पाप पुण्याचीं फळें भोगण्याचीं स्वतंत्र स्थानें नाहींत. पापपुण्यांप्रमाणें आत्म्यांना जीं दुःखें किंवा सुखें भोगावीं लागतात ती स्थिति म्हणजेच नरक व स्वर्ग असें समजावयाचें.

वरील सिद्धांतांवरून मनुष्य-जन्माचा हेतु म्हणजे आत्म्याचा उत्तरोत्तर नैतिकदृष्ट्या विकास करून त्यांस पूर्णत्वाप्रत नेणें असा दिसतो. ॲलन कारडेक् ह्यांनीं संकलित केलेला 'The Spirit's Book' हा मृतात्म्यांकडून मिळालेल्या माहितीवर आधारलेला तत्त्वज्ञान-विषयक पहिलाच ग्रंथ होय, ह्यांतील



अनुक्रमणिका





सिद्धान्त ख्रिस्ती धर्मांचेपेक्षां पुष्कळच निराळे आहेत. पण ते ख्रिश्चन देशांतील मृतात्म्यांकडून प्रतिपादन केले गेले ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. ॲलन कारडेक् हे शिक्षणतज्ज्ञ असून त्यांचा चरितार्थ उत्तम प्रकारें चाललेला होता. त्यांना धार्मिक दृष्ट्या निराळा पंथ काढून प्रसिद्धि मिळवण्याची हौस होती. किंवा तसा प्रयत्न त्यांनीं स्वार्थबुद्धीनें केला असेल असें त्यांचे चरित्रावरून संभवत नाहीं. ज्या मुलींचे मार्फत मृतात्म्यांचेकडून माहिती मिळाली त्या तर तत्त्वज्ञानविषयांत अगदींच अनभिज्ञ होत्या. तेव्हां जी काय माहिती मृतात्म्यांकडून मिळवून वरील पुस्तकांत संकलित केली आहे, ती खरोखरीच तशा प्रकारें मिळवली गेली ह्याबद्दल संशयास जागा दिसत नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या मुख्य तत्त्वज्ञानाला अनुलक्षून हजाराचेवर प्रश्नांचीं उत्तरें ह्या पुस्तकांत दिलेलीं आहेत. ती सर्वच उत्तरें सर्वांना पटतील असें नाहीं. पण एकंदरीनें प्रश्न चिकित्सक बुद्धीनें विचारलेले आहेत व उत्तरें पण व्यवस्थित व सुसंबद्ध दिसतात. कांहीं प्रश्नांची मृतात्म्यांनां माहिती देतां आली नाहीं त्याठिकाणीं त्यांनीं तसें स्पष्ट सांगितलें आहे.

गेल्या शतकांत परलोकविद्येचें युरोप व अमेरिकेंत आधुनिक व पद्धतशीर रीतीनें पुष्कळच संशोधन झालेलें आहे. यामध्यें नानातऱ्हेचे प्रयोग केलेले आहेत व त्या प्रयोगांवरून मृतात्म्यांना नुसते हस्तकामार्फत आपले विचार कळवतां येतात इतकेंच नव्हे तर अनुकूल परिस्थितींत मृतात्म्यांचे पूर्ववत् सदेह दर्शन होऊं शकतें व त्यांचा पूर्ववत् आवाज पण ऐकूं येऊं शकतो असें दिसतें. ह्या संशोधनाचा इतिहास मनोरंजक व उद्बोधक आहे पण ती माहिती द्यावयाची म्हणजे स्वतंत्र लेखांतच दिली पाहिजे.

परलोक-संशोधनाचे कार्यामध्यें पुष्कळ अडचणी आहेत, मतभेद झालेले आहेत. तें शास्त्रदृष्ट्या अजून पूर्णत्वास गेलेलें नाहीं. पण हलके हलके प्रयत्नानें अडचणी दूर होतील असें मानण्यास हरकत दिसत नाहीं. परलोक-संशोधनाच्या कार्यांत ज्या अडचणी दिसून येत आहेत. ह्याला अनेक कारणें आहेत. मनुष्याच्या इंद्रियांच्या शक्तींना मर्यादा आहेत तशा मृतात्म्यांच्या शक्तींना पण आहेत. आपल्या इंद्रियांच्या कक्षेबाहेरील ज्ञान मृतात्म्यानां होऊं शकत असलें तरी त्यावरून ते सर्वज्ञ आहेत असें धरून चालतां येणार नाहीं हें उघडच आहे. मृतात्म्यांच्या पूर्व कर्माप्रमाणें त्यांची परिस्थिति बदलत जाते. त्यांच्या बुद्धीच्या विकासामध्यें सुद्धां फरक असतो. त्यामुळें निरनिराळ्या मृतात्म्यांनीं एकाच प्रश्नास दिलेल्या उत्तरांमध्यें कांहीं वेळां विसंगतपणा दिसून येतो. कांहीं वेळां एका मृतात्म्याला हस्तकामार्फत बोलाविलें असतां दुसराच त्याचे जागीं येऊन खोडसाळपणें चुकीची उत्तरें देतो, असेंहि अनुभवास आलेलें आहे. अशा प्रकारच्या अनेक कारणामुळें हें संशोधन फार बिकट असून त्यामध्यें दीर्घकाळपर्यंत अत्यंत चिकित्सक बुद्धीनें व नेटानें प्रयत्न करण्याची आवश्यकता असते व त्यामुळेंच निश्चित सिद्धान्त उपलब्ध होण्यास मोठा अवधि लागतो. तथापि अशा तऱ्हेचे प्रयत्न अनेक ठिकाणीं सतत चाललेले आहेत. त्यामुळें मरणोत्तर स्थितीविषयीं आपले ज्ञानांत उत्तरोत्तर पुष्कळ भर पडत जाईल असें मानण्यास हरकत दिसत नाहीं.

## परलोक – संशोधनामागें व्यावहारिक दृष्टि

संशोधनाचा उपयोग प्रायः व्यावहारिक दृष्टीनें केला जातो. म्हणजे आपल्या दिवंगत झालेल्या इष्टमित्रांशीं बोलण्याची ज्यांची इच्छा असते किंवा त्यांचेमार्फत ज्यांना कांहीं विशिष्ट माहिती पाहिजे असते असेच लोक बहुधा हस्तकांचे मार्फत तशी माहिती मिळविण्याचा प्रयत्न करीत असतात. अलीकडे मृतात्म्यांचेकडून रोग बरे करण्याचें कामीं मदत घेण्याचाहि पुष्कळ प्रयत्न चालला आहे. ३१ मार्च १९५६ चे 'Psychic News' ह्या नांवानें लंडन येथें प्रसिद्ध होत असलेल्या एका साप्ताहिकांत अशा तऱ्हेनें एका मृत जर्मन डॉक्टरनें अदृश्य स्वरूपांत येऊन एका रोग्याचे पोटांतील अल्सर ( ulcer ) पुष्कळ इलाज करून बरें होत नव्हतें तें ऑपरेशन करून बरें केल्याची हकीकत आली आहे ! अशा तऱ्हेच्या हकीकतीवर विश्वास ठेवणें कठीण वाटतें. परंतु ही हकीकत सर्व सविस्तर दिलेली आहे, व रोग्याचा भाऊ डॉक्टरच होता, त्यानें पुन्हां operation करून अलसर बरें झाल्याबद्दल खात्री करून घेतली असें पण त्यांत सांगितलें आहे ! आज सर्व शास्त्रांतून संशोधनाची प्रगति इतकी झपाट्यानें होत आहे कीं आज अशक्य वाटणारी गोष्ट थोड्याच काळांत शक्यच नव्हे तर नित्यपरिचयांतील होते








असा अनुभव आहे. आज नित्यपरिचयांतील सिनेमा, रेडिओ, विमानें वगैरे अशा कोटींतील उदाहरणें आहेत. परलोकविद्येमध्येंहि गेल्या शतकांत पुष्कळ संशोधन झालेलें आहे व महत्त्वाचे शोध लागलेले आहेत. ह्या संशोधनामध्यें सर विल्यम् क्रुक्स, सर ऑलिव्हर लॉज ह्यांच्यासारखे पुष्कळ नामांकित, बुद्धिमान् शास्त्रज्ञ पडले होते व त्यांनीं स्वतः चिकित्सक पद्धतीनें प्रयोग करून घेतलेल्या अनुभवाबद्दल त्यांची खात्री झालेली होती.[1] तेव्हां हें संशोधन अडाणी किंवा भोळसर लोकांचा भ्रम आहे म्हणून त्याची आतां उपेक्षा करतां येणार नाहीं. वर लिहिल्याप्रमाणें त्यांत अजून अपूर्णता आहे. परंतु त्यामधील कांहीं सिद्धांत म्हणजे उदाहरणार्थ मनुष्याच्या आत्म्याचें मरणोत्तर अस्तित्व व व्यक्तिमत्त्व कायम रहातें, त्याला पूर्वजन्मींची आठवण असते व आपल्या आप्तेष्टांशीं बोलण्याची व त्यांना मदत करण्याची इच्छा असते, व तशा तऱ्हेनें जो बोलूं व मदत करूं शकतो, वगैरे निर्विवाद सिद्ध झालेलें आहे ही गोष्ट ह्या संशोधनाचा इतिहास काळजीपूर्वक पाहिल्यावर बहुतेकांस पटेल असें वाटतें. धर्म व नीति ह्यांचे दृष्टीनें हे सिद्धांत महत्त्वाचे असून ह्या संशोधनानें जडवादाचें खंडन होऊन धर्मजागृतीला मदत झालेली आहे.

ॲलन कारडेकूचे ग्रंथावरून तत्त्वज्ञानाचे दृष्टीनेंपण परलोक संशोधनाचें किती महत्त्व आहे हें लक्षांत येईल. ह्या दिशेनेंपण युरोप व अमेरिकेमध्यें आणखी प्रयत्न झालेले आहेत. मृतात्म्यांकडून मिळालेल्या माहितीवर आधारलेले असे पंथहि निर्माण झाले आहेत. ह्या पथांतील लोकांच्या नियमित सभा वगैरे भरत असतात व चर्चमध्यें सर्मन्स होतात, त्याप्रमाणें Spiritualist चर्चमधून Spiritism वर व्याख्यानें होत असतात. पुष्कळ लोक 'फॅमिली सर्कल' करून ह्या विषयांचे प्रयोग नियमितपणें करीत असतात. 'Medium' किंवा हस्तकाची शक्ति ज्यांच्यांत असते असे पुष्कळ लोक वर्तमानपत्रांत जाहिराती देतात व त्यांचेकडे ठराविक दिवशीं व ठराविक वेळेला फी देऊन लोक प्रयोगार्थ जातात. हिंदुस्थानांतमात्र ह्या शास्त्राचें संशोधन फारच थोडें झालेलें दिसतें. महाराष्ट्रांत श्री. ऋषि ह्यांचें नांव ह्या शास्त्रांमधील तज्ज्ञ म्हणून प्रसिद्ध आहे. त्यांनीं Indian Spiritualist Society म्हणून एक मुंबईस संस्था चालविलेली आहे. पण त्यांना अवश्य तसा सुज्ञ जनतेचा संशोधनक्षेत्रांत पाठिंबा मिळालेला आहे असें दिसत नाहीं. श्री. ऋषि ह्यांचेकडे पुष्कळ लोक आपल्या इष्टमित्रांच्या मृतात्म्यांशीं संवाद करण्याच्या व्यावहारिक हेतूनें जातात, व तशा तऱ्हेचे प्रयोग त्यांचे निवासस्थानी केले जातात, पण ते प्रयोग 'संशोधन' ह्या दृष्टीनें केले जात नाहींत. भरतखंडांत आत्मविद्येचा अभ्यास फार प्राचीन कालापासून झालेला आहे. परंतु युरोप व अमेरिकाखंडामध्यें गेल्या शंभर वर्षांत परलोक-विद्येचें आधुनिक पद्धतीनें जसें नाना ठिकाणीं संशोधन चाललेलें आहे तशा तऱ्हेचें संशोधन पद्धतशीर रीतीनें करणारी एकहि संस्था ह्या देशांत नसावी ही आश्चर्याची व खेदाची गोष्ट आहे!

---

१ सर ऑलिव्हर लॉज यांच्या यासंबंधीं अभिप्रायाचा एक उतारा प्रारंभीं दिला आहे. सर वुलियम क्रुक्सप्रभृतींचे पुढील उतारे बघावे.

'It is quite true that a connection has been set up between this world and the next' Sir william Crooks, F. R. S.

'I am absolutely convinced of the fact that those who once lived on earth can and do communicate with us'- Sir william Barret F. R. S.



अनुक्रमणिका








श्री. लीला द. गोळे

# तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतील विविध विचारप्रवाह

**भारतीय तत्त्वज्ञानपरिषदेचें** तिसावें अधिवेशन गेल्या डिसेंबरमध्यें नागपूर येथें भरलें होतें. या अधिवेशनाचे प्रमुख अध्यक्ष मद्रास विद्यापीठांतील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक **श्री. टी. एम्. पी. महादेवन्** हे होते. या अधिवेशनांत विषयवार असे चार विभाग होते. एक विभाग **मानसशास्त्रीय** प्रश्नांकरितां असून त्याचे अध्यक्ष त्रावणकोर विद्यापीठांतील मानसशास्त्राचे प्राध्यापक **श्री. बे. एस्. नारायण पिलाइ** हे होते. आणखी एक विभाग '**तर्कशास्त्र व सत्ताशास्त्र**' याकरितां होता व त्याचे अध्यक्ष कलकत्ता येथील प्रेसिडेन्सी महाविद्यालयांतील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक श्री. पी. जे. चौधरी हे होते. आणखी एक तिसरा विभाग '**तत्त्वज्ञानाचा इतिहास**' असा असून त्याचे अध्यक्ष बडोदें येथील म. स. विद्यापीठांतील तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुख श्री. डी. एम्. पटेल हे होते. चौथा विभाग '**नीतिशास्त्र व समाजशास्त्र**'चा होता व ' Aryan Path ' च्या प्रसिद्ध संपादिका **श्रीमती सोफिआ वाडिया** या त्या विभागाच्या अध्यक्ष होत्या. या चार विभागाध्यक्षांनीं व मुख्य अध्यक्षांनीं जीं भाषणें केलीं त्यांचा सारांश व समालोचन येथें दिलें आहे. त्यावरून तत्त्वज्ञानक्षेत्रांत हल्लीं कोणते विविध विचारप्रवाह चालू आहेत त्याची कल्पना येऊं शकेल.

श्री. पिलाई

## सौंदर्यानुभूतीचें मानसशास्त्र : Psychology of Aesthetic Experience

सौंदर्यानुभूति ही एक माणसाच्या भाव-जीवनांतली अमोल वस्तु आहे. परंतु सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासांत त्या अनुभूतीमध्यें अंतर्भूत झालेल्या मानसिक प्रक्रियांचा व्हावा तितका सूक्ष्म अभ्यास झालेला दिसत नाहीं. कलानिर्मितीच्या वेळीं कलावंताला कोणती व कशाप्रकारची अनुभूति येते याचा अभ्यास करणें अतिशय आवश्यक आहे. समाजशास्त्रीय संशोधनावरून असें स्पष्ट झालें आहे कीं कलाकृतीचें पूर्णस्वरूप समजण्याकरितां कलानिर्मितीच्या वेळची कलावंताची मानसिक अनुभूति कळणें जरूर आहे व तें कार्य मानसशास्त्राचें आहे ... ( The actual nature of the activity which we call aesthetic and which gives rise to such objects remains an important psychological problem) – अर्थात् अशा संशोधनामध्यें तीन महत्त्वाच्या अडचणी येतातः– (अ) सर्व कलावंत कलानिर्मितीच्या वेळीं येणाऱ्या अनुभूतीची कदर बाळगणारे ( कधीं कधीं बाळगूं शकतील असे ) नसतात. (आ) बरेचदां कलावंत आपल्या अनुभूतीसंबंधीं जें सांगतात तें फारच संदिग्ध असतें. ( अि ) कित्येकदां कलावंतांनीं केलेलीं विधानें सौंदर्यशास्त्रापुरतीं मर्यादित न राहातां अतिव्याप्त व सामान्य स्वरूपाचीं असतात. – या अडचणींमुळें सौंदर्यानुभूतीचें यथायोग्य दर्शन घडणें दूरापास्त होतें. तरीपण या अडचणी लक्षांत ठेवूनहि जागरूकपणें सौंदर्यानुभूतीचें विश्लेषण करणें आवश्यक आहे. ही जागरूकता राखली नाहीं तर कोणते प्रमाद घडतात याचें उत्तम उदाहरण मानसशास्त्रांतील ' मनोविश्लेषण ( Psycho – Analysis ) पद्धतीमध्यें दिसून येतें. मनांतील दडपून ठेवलेल्या कामवासनेची कल्पनाविलासाच्या साहाय्यानें केलेली तृप्ति म्हणजेच कलानिर्मिति असें मनोविश्लेषणवाद्यांचें मत आहे. या विधानांतील सत्यांश मान्य केला तरीहि सर्व प्रकारच्या – उच्च व नीच – कलाकृतींना तें विधान लागूं पडत नाहीं ही गोष्ट शास्त्रज्ञांनीं दाखवून दिली आहे. प्रत्यक्ष फ्रॉइडलाहि सौंदर्यानुभूतीचें संपूर्ण स्पष्टीकरण स्वतःच्या पद्धतीनें मिळूं शकत नाहीं हें मान्य आहे. –– तेव्हां सौंदर्यानुभूतीचें विश्लेषण करणें अगत्याचें जसें आहे तसेंच अतिशय बिकट आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

सौंदर्यानुभूतींतील दुसरा महत्त्वाचा संशोधनीय भाग म्हणजे रसिकाची सौंदर्यास्वादाची अनुभूति ! या संशोधनांत सौंदर्यविषयक भावना कोणत्या ? सौंदर्याकडे पाहाण्याचे विविध दृष्टिकोन कोणते ?, कलावस्तूचें

स्वरूप कसें असावें ?, कलेचा हेतु काय असावा ?, व कलावंताच्या मनांतील हेतूचें ज्ञान कलास्वादनासाठीं आवश्यक आहे काय ? इत्यादि प्रश्नोपप्रश्न निर्माण होतात. या प्रश्नाचीं उत्तरें देणें सोपें काम नाहीं हें उघड आहे. परंतु तो प्रयत्न व्हायला पाहिजे.

या अभ्यासांतील तिसरा महत्त्वाचा भाग म्हणजे सौंदर्ययुक्त कलाकृतीची समीक्षा–समीक्षकाचें मुख्य कार्य रसिकाला कलास्वाद घेण्यासाठीं मदत करणें हें होय. तें करीत असतांना त्यानें फारच जागृत राहिलें पाहिजे. कल्पना, सहानुभव, सौंदर्याभिव्यक्ति इत्यादि शब्दांचा वापर करतांना त्या शब्दांना चिकटलेल्या मानसिक भावनांचा विचार करून मगच त्यांचे अर्थ त्यांनीं निश्चित करून घेतले पाहिजेत; व मगच शब्दांची नेमकी योजना केली पाहिजे. शब्दांचा अपव्यय अथवा वृथा काटकसर करून रसिकांची दिशाभूल त्यानें करतां कामा नये.

सौंदर्यानुभूतीमध्यें समाविष्ट होणारे कलावंत, रसिक व समीक्षक हे तीन महत्त्वाचे घटक आहेत. त्यांच्या अनुभूतींचा मानसशास्त्रीय अभ्यास अधिक सूक्ष्म रीतीनें व्हावा ही श्री० पिलाअींची सूचना मान्य होण्याजोगीच आहे. अर्थात् त्या अभ्यासांत येणाऱ्या अडचणींचेंहि त्यांनीं दिग्दर्शन केलें आहे.

---

श्री. पी. जे. चौधरी

## ज्ञान व सत्य : Knowledge and Truth

ज्ञान व सत्य यांचे परस्परसंबंध काय आहेत ? हा सत्ताशास्त्रांतील अत्यंत मूलभूत प्रश्न आहे. श्री. चौधरी यांनीं ह्या प्रश्नाच्या कांहीं बाजू या भाषणांत मार्मिकपणें हाताळल्या आहेत. आपल्याला होणाऱ्या ज्ञानाच्या चार पातळी त्यांनीं दाखवून दिल्या आहेत. **( अ ) अिन्द्रियजन्य ज्ञान** – येथें ज्ञाता ( १ ) याला ज्ञेय ( १ ) यांचें ज्ञान होतें. जसें 'समोर कांहींतरी लाल विस्तृत आहे'. मन म्हणजे अशा इन्द्रियजन्य ज्ञानाची एक जन्त्री आहे असें ह्यूम सारख्या तत्त्वज्ञांनीं मानलें आहे. परंतु हें इन्द्रियजन्य ज्ञान सत्य आहे कीं असत्य आहे हें ठरवावयाचें झाल्यास ही प्राथमिक पातळी सोडून आपल्याला वरच्या पातळीवर जावें लागतें. **( आ ) निसर्ग-नियमांचें ज्ञान** – ही दुसरी पातळी म्हणजे बुद्धीच्या व विज्ञानाच्या द्वारें प्राप्त होणारें जगद्-विषयक ज्ञान. गणिताच्या भाषेंत यालाच, ज्ञाता २ याला ज्ञेय २ याचें होणारें ज्ञान असें म्हणतां येईल. येथें पदार्थांचें व त्यांच्या परस्परसंबंधाचें ज्ञान होतें. जसें "हें गुलाबाचें फूल आहे-तें फुलदाणींत ठेवलें आहे इ०". या पातळीवरील ज्ञानाची सत्यासत्यता ठरविण्यासाठीं आपल्याला पुढच्या तिसऱ्या पातळीवर जावें लागतें. ( अि ) निसर्गांतील नियमांचें संशोधन करतां करतां नियंत्यासंबंधीचे विचार अपरिहार्य होतात व नियंत्याच्या दृष्टीनें या नियमांचें सत्यासत्यत्व पारखून घेणें आवश्यक बनतें. कान्ट–हेगेल–आदि तत्त्वज्ञांनीं या तिसऱ्या पातळीचें महत्त्व ओळखलें, व चराचर वस्तूंचें अस्तित्व म्हणजे त्या नियंत्याची छाया (Projection of the Absolute) अशीच त्यांची विचारसरणि झाली. या तिसऱ्या पातळीवरून पाहिलें तर पहिल्या दोन्ही पातळीवरील ज्ञान कमी सत्य ठरेल. गणिताच्या भाषेंत असें म्हणतां येईल कीं ज्ञाता ३ ह्याला होणारें ज्ञेय ३ चें ज्ञान लक्षांत घेतां ज्ञाता १ व ज्ञाता २ ला होणारें ज्ञेय १ व ज्ञेय २ चें ज्ञान अपुरें होय. ( अी ) परंतु या तिसऱ्या पातळीवरील ज्ञानाची सत्यासत्यता पारखण्यासाठीं आणखी एका चवथ्या पातळीवर जावें लागतें. असें शंकराचार्य, स्पिनोझा, ब्रॅडले आदि तत्त्वचिंतकांचें मत आहे. या चवथ्या पातळीवर ज्ञाता ४ व ज्ञेय ४ अशा तऱ्हेचें द्वैत न राहतां त्यांचा लोप होतो; व केवल शुद्ध ज्ञान शिल्लक राहातें. तें पूर्ण सत्य असतें कारण त्याच्याशिवाय दुसरें कांहींच अस्तित्वांत नसतें. यालाच शंकराचार्य 'ब्रह्मन्' म्हणतात. या पातळीवरून पाहिलें तर बाकीच्या तिन्ही पातळीवरून ज्ञान केवल भ्रममूलक व म्हणून मायाविष्ट होय. अज्ञानामुळें ब्रह्मन्वर जगत् भासतें परंतु पारमार्थिकसत्तेच्या दृष्टीनें पाहिलें तर जगताचा व ब्रह्माचा कांहींच संबंध नाहीं कारण ब्रह्म सत्य आहे; जगत् मिथ्या आहे.

ज्ञान व सत्य यांच्या परस्परसंबंधाचा प्रश्न अतिशय विवाद्य आहे. तरीपण ज्ञानाची सत्यासत्यता पारखीत असतांना एक अशी पातळी येतें कीं जेथें सत्य











च ज्ञान हीं एकरूपच बनतात. किंब्रहुना सत्य व असत्य ज्ञान असा फरकच येथें उतरत नाहीं. केवल ज्ञान–केवल सत्य उरतें. अर्थात् या पातळीपूर्वींच्या पातळींवरील ज्ञान उत्तरोत्तर उच्च होत जाणाऱ्या ज्ञानाच्या कसोटीवर घासून मगच सत्यासत्य ठरवावें लागतें. या ज्ञानांच्या भिन्नभिन्न पातळीचें अधिक सूक्ष्म विवेचन स्वप्न, सुषुप्ति, जागृति व तुरीया या चार अवस्थांचें विवेचन करीत असतांना गौडपादाचार्यांनीं ( मांडूक्यांत ) व शंकराचार्यांनीं ( भाष्यांत ) उत्तम केलें आहे. अर्थात् श्री. चौधरींनीं त्यांचा ओझरता उल्लेख केलाच आहे. हा विषय सत्ताशास्त्रीय समस्यांपैकीं एक असल्यामुळें शास्त्रीय व सूक्ष्म होणें अपरिहार्यच आहे. सर्वसामान्य वाचकाला सकृतदर्शनीं तो किचकट वाटण्याचा संभव असल्यानें त्याचा ऊहापोह येथें अधिक करीत नाहीं.

**श्री. डी. एम्. पटेल**

## तत्त्वज्ञानाच्या इतिहासाची शिकवण : Teachings of History of Philosophy

श्री. पटेलांनीं तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचा – विशेषतः पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या – धावता आढावा घेऊन त्यांतून आपल्याला कोणती शिकवण मिळते हें दाखविलें आहे. विवेचन विस्तारानें देणें शक्य नसल्यानें नुसते मुद्दे खालीं दिले आहेत.

[ अ ] सत्याचें ज्ञान होण्याच्या दृष्टीनें भाषा अतिशय थिटी व अपुरी पडते.

[ आ ] शास्त्रज्ञाप्रमाणेंच तत्त्वज्ञांनींसुद्धां सत्याविषयीं घेतलेले स्वतःचे निर्णय हे अखेरचे अथवा अटळ आहेत असें मानतां कामा नये.

[ इ ] तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाला माणसाच्या जाणिवेच्या सर्व अंगोपांगांची दखल घेणें अपरिहार्य असतें. एकट्या भावनेवर अथवा एकट्या बुद्धीवर किंवा इन्द्रियजन्य ज्ञानावर तें कधींच उभें राहू शकत नाहीं.

[ ई ] यामुळेंच तत्त्वज्ञानाला इतर सर्व शास्त्रांनीं शोधून काढलेल्या सिद्धान्तांचा विचार करणें भाग असतें. त्यादृष्टीनें पाहिलें तर तत्त्वज्ञान म्हणजे जीवनांतील विविध क्षेत्रांतील ज्ञानप्रक्रियांचा व विचारप्रणालींचा एक अनुपम समन्वय होय असें म्हणतां येईल.

[ ऊ ] ज्या ज्या तत्त्वजिज्ञासूंनीं बुद्धीच्या अतीत असणाऱ्या अशा ज्ञानाची अनुभूति घेतली अथवा आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेतला त्यांनींच महत्त्वपूर्ण अशा तत्त्वदर्शनांची निर्मिति केली. – असे थोर संत, तत्त्वजिज्ञासूंच्या मार्गावरचे वाटाडे ठरले. उदा. प्लेटो, ॲरिस्टॉटल, कान्ट, हेगेल, बर्गसाँ, ब्रॅडले किंवा शंकराचार्य, अरविंद इत्यादि.

सर्वसामान्यपणें लेखकानें घेतलेले निर्णय मान्य होण्याजोगेच आहेत. परंतु तत्त्वज्ञानापासून मिळणारी शिकवण एवढ्यावरच संपते असें वाटत नाहीं. अर्थात् याची जाणीव लेखकालाहि असावी असें वाटतें. वेल्स, आइन्टीन यांसारखे शास्त्रज्ञ, मार्क्स, लेनिन इत्यादि समाजशास्त्रवेत्ते, शॉ, रसेल गांधी इत्यादि थोर विचारवंत या सर्वांची गणना जर तत्त्वज्ञांमध्यें केली तर तत्त्वज्ञानामुळें मिळणाऱ्या शिकवणीचा व्याप फारच मोठा मानावा लागेल. शिवाय तत्त्वज्ञान हा केवळ अभ्यासाचा विषय नसून जगण्याचा मार्ग असल्यामुळें त्यामधून नवनवीन अशीं कित्येक तत्त्वें व धडे आजपर्यंत मानवाला मिळत आले आहेत व पुढेंहि मिळत राहातील. त्यामुळें तत्त्वज्ञानाच्या इतिहासाच्या शिकवणींची क्रमवार यादी–बेरीज करणें अत्यंत बिकट काम आहे. परंतु हा विषय हाताळून लेखकानें तत्त्वज्ञानाच्या मौलिक कार्यांचें दर्शन घडवलें आहे यांत शंका नाहीं.

**श्री. सोफिया वाडिया**

## सम्यक नैतिक मूल्याची आवश्यकता

( The Need of To-day : Right Moral Discipline )

ज्यावेळीं जुन्या मूल्यांची सद्दी संपलेली असते आणि नवमूल्यांचा ठावठिकाणा नसतो त्यावेळीं माणसाची स्थिति अत्यंत दयनीय असते. अशावेळीं विश्वांत कांहीं शिस्त, नियमबद्धता आहे किंवा नाहीं याचीच त्याला शंका वाटूं लागते. आंतरिक सुरक्षिततेची व निश्चिततेची अंधुकशी आशाहि त्याला वाटेनाशी होते. परंतु ही अवस्था फार काळ टिकणें मानवी स्वभावाच्या दृष्टीनें दुरापास्त असल्यामुळें तो नवीन मूल्यांचें संशोधन करूं लागतो, आणि जीवनाला



अनुक्रमणिका






पुन्हां अर्थ प्राप्त करून देण्याचा आटोकाट यत्न करतो. जीवनाचा अर्थ काय ? – या मूलभूत प्रश्नाचें चिंतन करतां करतांच नैतिक मूल्यांचा उदय होतो.

आजचा मानव अशाच संक्रमणावस्थेंत आहे. त्यामुळें मूल्यांच्या भरभक्कम मानदंडाची त्याला अतिशय जरूर आहे. आज बाह्य उपचारांवर अथवा कर्मकांडावर भर देणाऱ्या व अंधश्रद्धेवर आधारलेल्या धर्माची मातब्बरी चालू शकणार नाहीं. बुद्धीला अविरोधी, विज्ञानाला अविरोधी असा आणि सत्याचें निखालस स्वरूप ओळखणारा खरा धर्म सध्याच्या मानवाला पाहिजे आहे. जीवनमूल्यें सांगून समाजाच्या विकासाला व धारणेला कारणीभूत होतो तो धर्म ! आज धर्माची फार आवश्यकता निर्माण झालीआहे. या धर्माची ओळख पटण्यासाठीं भारतीय तत्त्वज्ञानांत एक अमोल उपाय सुचवला आहे; तो म्हणजे अंतर्मुख बनणें. आत्मदर्शन घेण्याचा यत्न करणें. आत्मदर्शनाच्या मार्गावर पाऊल जेवढें पुढें पडेल तेवढ्या प्रमाणांत मानवाच्या जीवनांत आचार-शुद्धि व विचारशुद्धि येऊं लागेल, लोककल्याणासाठीं झगडण्याची वृत्ति निर्माण होईल. शेवटी अंतःप्रेरणेनें व आंतरिक आनंदानें ओतप्रोत भरलेला तो थोर मानव आपलें उभें जीवन परोपकाराकरितां वेचील.

श्रीमती वाडियांनीं उत्कट तळमळीनें आजची परिस्थिति व तिला असणारी नैतिक मूल्यांची गरज पटवून दिली आहे. मोठमोठ्या विचारवंतांपुढें हेंच ध्येय आहे. परंतु तें कसें साध्य करावयाचें हाच फार बिकट प्रश्न आहे. हा सूक्ष्म व व्यापक विचार आचारांत कसा आणावयाचा हें मोठें कोडें आहे. अशा विचारांवर समाजसेवकांकडून बरेचदां टीका होते ती यामुळेंच. विचार प्रत्यक्षांत आणण्यासाठीं उपाययोजना निर्माण होण्याची आज अतिशय आवश्यकता आहे. अर्थात् प्रत्येक विचारवंतानें आचाराचे मार्गहि सुचवलेच पाहिजेत असा कांहीं नियम नाहीं. किंबहुना कित्येकदा विचार प्रथम निर्माण होतो व मगच आचाराचे मार्ग सुचूं लागतात असें दिसून येतें. या दृष्टीनें पाहिलें तर श्री. सोफिया वाडिया यांनीं मांडलेल्या विचाराचें महत्त्वहि कांहीं कमी नाहीं.

श्री. टी. एम्. पी. महादेवन्

## मानवाचें पुनः संशोधन : The Rediscovery of Man

तत्त्वज्ञान परिषदेचे अध्यक्ष श्री. महादेवन् यांनीं आपल्या भाषणामध्यें तत्त्वज्ञानामधील अंतर्मुखतेवर ( Inwardness ) अधिक प्रकाश टाकण्याचा यत्न केला आहे. तत्त्वज्ञान हा कांहीं केवळ बौद्धिक कसरतीचा किंवा बौद्धिक करमणुकीचा विषय नाहीं. परंतु तत्त्वज्ञानाचा अितिहास बारकाईनें पाहिला तर असें आढळून येतें कीं इतर शास्त्रांप्रमाणेंच 'अंतर्मुखतेचें' हें महत्त्वाचें अंग कित्येकदां तत्त्वज्ञानामध्येंहि उपेक्षिलें गेलें आहे. अंतिम सत्य अेक आहे कीं अनेक आहे, जगताचें स्वरूप काय, जीवाचें स्थान काय ? – इत्यादि सत्यविषयक ( Ontological ) व जगत्‌विषयक ( Cosmological ) प्रश्न सोडवण्यामध्येंच बरेचदां तत्त्वज्ञांची कुशाग्र बुद्धि खर्ची पडली आहे. थेलिसपासून कान्टपर्यंत पाश्चात्त्य तत्त्वज्ञानामध्यें जे भिन्नभिन्न कालखंड येतात त्यांतील बहुसंख्य तत्त्वज्ञांनीं बहिर्मुख-अभ्यास-पद्धतीचा ( Externalist Study of man and the world ) स्वीकार केलेला आढळतो. भारतीय दर्शनांपैकीं न्याय वैशेषिक, आणि थोड्या फार प्रमाणांत सांख्य यांनींहि जीव, जगत् व जगन्नाथ या तीन मूलभूत प्रश्नांचा विचार करीत असतांना बाह्यांगाकडून अंतरंगाकडे जाण्याची पद्धति म्हणजे – बहिर्मुख-अभ्यासपद्धति स्वीकारली आहे असें दिसतें.

या पद्धतीची परिणति आज ज्या विचारप्रणालीला Logical-Positivism असें संबोधतात तिच्यामध्यें झालेली आढळते. इन्द्रियजन्य ज्ञान तेवढेंच खरें हा यांचा मूलभूत सिद्धांत. त्यामुळें इन्द्रियातीत ज्ञानावर आधारलेलें सत्ताशास्त्र, यांच्या मतें हास्यास्पदच होय. तसेंच परमेश्वर आहे किंवा नाहीं इत्यादि प्रश्नहि प्रत्यक्ष ऐन्द्रियज्ञानाच्या पलीकडचे असल्यामुळें निरर्थ होत. थोडक्यांत म्हणजे मध्ययुगीन कालांत ज्याप्रमाणें तत्त्वज्ञान केवळ धर्माची बटीक बनलें होतें त्याचप्रमाणें आजहि तत्त्वज्ञानाला Logical Positivism च्या दृष्टीनें पाहिलें तर निव्वळ धर्मसेविकेचाच दर्जा प्राप्त झाला आहे.

परंतु विज्ञानाला अंतिम-सत्य मानणें म्हणजे निव्वळ आग्रहीपणा असल्यामुळें युरोपमध्येंच या मतप्रणालीला दोन मोठाल्या प्रतिक्रिया झाल्या. त्यांचा आपण थोडक्यांत विचार केला तर तत्त्वज्ञानाचें मुख्य अंग जें ' अंतर्मुखता ' त्याचें महत्त्व आपल्याला पटूं शकेल.

( १ ) एक्झिस्टेन्शिॲलिझम् (**Existentialism**) : या तत्त्वशाखेच्या मतें तत्त्वज्ञानाचें प्रमुख कार्य मानवाचें स्पष्टीकरण करणें, व जगतांतील विविध संघर्षाशीं तोंड देण्यासाठीं तयार होत असतांना त्याला मदत करतें हें होय. मानव हा एक अस्तित्ववान् प्राणी आहे आणि स्वतंत्रता व व्यक्तिमत्त्व हे त्याचे विशेष गुण आहेत. – Existentialism च्या पुरस्कर्त्यांनीं या भांडवलावर उभारलेलें मंदिर मात्र बरेंच तकलादू आहे. सार्त्र जेस्पर्स इत्यादि अध्वर्यूंच्या लेखनावरून असें दिसतें कीं शेवटीं Existentialism ला मानवाचें मर्म ओळखतां आलें नाहीं. मानव म्हणजे एक वासनांचा गोळा किंवा फारतर भावनांचा पुतळा आहे. इथपर्यंतच त्यांच्या विचाराची मजल गेलेली दिसते. ( Man is an unwanted being; in the words of Sartre, Man is a useless passion.) म्हणजे बाह्यांगाला फांटा देऊन अंतरंगावर भर देणारी ही विचारप्रणालीहि व्हावी तितकी यशस्वी होऊं शकली नाहीं. त्यामुळें आत्मसंशोधनापासून सुरुवात करूनहि अद्वैत वेदान्त्यांना जो निर्णय मिळूं शकला तो निर्णय त्यांना मिळाला नाहीं. उलट प्रत्येक जीवाला स्वतंत्र अस्तित्व आहे आणि इतर जीवांचें अस्तित्व म्हणजेच माझ्या पापाचें कारण होय अशा तऱ्हेची विचार-प्रणाली त्यांना मांडावी लागली. ( The existence of another person is the cause of my originalisin. )

या तत्त्वप्रणालीचें महत्त्वाचें कार्य म्हणजे माणसाच्या अंतर्जीवनाचें महत्त्व ओळखून त्यांनी विचारवंतांचें लक्ष त्याच्या संशोधनाकडे वेधून घेतलें हें होय. तत्त्वज्ञानांतील या प्रणालीचा परिणाम म्हणूनच कीं काय विज्ञानांत व मानसशास्त्रांतहि अंतरंगावर लक्ष अधिक केन्द्रित केलें जाऊं लागलें व Logical Positivism ला दुसरी प्रतिक्रिया निर्माण होऊं लागली.

( २ ) अमेरिकेंतील बरो आणि इतर वैज्ञानिकांनीं फायलोबायॉलाजी अथवा फायलो-पॅथॉलाजी नांवाची जी पद्धति शोधून काढली तिच्यामध्यें आत्मविश्लेषणावर ( Self-Analysis ) बराच भर दिला. मानवी मनाच्या विकृतीचें संशोधन करतांना त्यांना असें आढळून आलें कीं विकृतीचें मूळ दडपलेल्या कामवासनेंत, किंवा शारीरिक व्यंगांतच केवळ नसून आणखी सूक्ष्म अशा भागामध्यें दडलें आहे. या सूक्ष्म भागाचा संबंध त्याच्या संपूर्ण-अस्तित्वाशीं ( Whole Organism शीं ) आहे व त्यावर उपाय करावयाचे झाले तर पूर्ण अस्तित्वावर परिणाम करणाऱ्या योगादिप्रक्रियांचा अवश्य उपयोग केला पाहिजे.

पॅरॅसायकॉलाजी नांवाच्या मानसशास्त्रीय प्रणालीनें त्याहीपुढें जाऊन मनाच्या अद्वितीय शक्तीची सप्रयोग सिद्धता केली व ( १ ) विचार-संवाहन ( Telepathy = Thought Transference ) शक्य आहे, (२) अतीन्द्रिय दर्शन–ऐन्द्रियज्ञानाच्या मदतीशिवाय वस्तूंचें ज्ञान होणें शक्य आहे, ( Clairvoyant Perception (३) भविष्याचें आगाऊ ज्ञान होणें शक्य ( Pre-cognition ), ( ४ ) मनःशक्तींच्या सामर्थ्यावर जडवस्तूंच्या गतीवर ताबा चालवतां येणें शक्य आहे ( Phycho-Kinesis ), (५ ) या शक्ति कांहीं विशिष्ट लोकांमध्यें आढळतात असें नसून सामान्य माणसामध्येंहि या मनःशक्तींचें अस्तित्व असतें–अशा तऱ्हेचे अजब शोध लावले आहेत.

एकांगी भौतिक शास्त्रांना प्रतिक्रिया म्हणून या दोन्ही वैज्ञानिक प्रतिक्रियांचें महत्त्व मोठें आहे. शिवाय शरीर व मन यांच्यांतील पुरातन कालापासून चालत आलेलें द्वैत, त्यांच्या प्रयत्नामुळें बरेंचसें नाहींसें झालें आहे. मानवी मनाच्या शक्तींची झेप कोठवर जाऊं शकते यांचें त्यांनीं सप्रयोग दिग्दर्शन केलें आहे. शिवाय त्यांच्या विवेचनांवरून अंतरंगावर भर देणें हें अशास्त्रीय मुळींच नाहीं हें सिद्ध झालें आहे.

अद्वैतवेदान्तानें याच अंतर्मुखतेवर आपलें लक्ष प्रामुख्यानें केंद्रित केलें आहे. अर्थात् अंतर्मुख होणें ( Inwardness ) याचा अर्थ केवळ अंतर्निरीक्षण करणें ( Introspeclion ) किंवा अंतर्मुख ( Introvert ) बनणें असा मुळींच नव्हे हें येथें









अनुक्रमणिका

स्पष्ट केलें पाहिजे. जें व्यक्ति व वस्तूच्या ( subject & object ) अतीत आहे अशा परतत्त्वाचें दर्शन घेण्याचा यत्न करणें म्हणजे अंतर्मुख होणें. या अंतःस्थाचें दर्शन होण्यासाठीं जी पद्धति अथवा साधन घ्यावयाचें त्याला अंतःसंशोधन असें म्हणतां येईल. या परमज्ञानाचा गाभा आपल्याला केवळ इन्द्रियजन्य ज्ञानाच्या अथवा बुद्धीच्यायोगें होऊं शकणार नाहीं. अंतर्दृष्टि ( Intuition ) च्या साहाय्यानें आपल्याला तेथपर्यंत पोचतां येतें. याच क्रियेला 'योग' असें म्हणतात. योग म्हणजे अंतर्दृष्टि किंवा अंतर्नादाच्या साहाय्यानें सत्याशीं एकरूप होण्याचा यत्न. – या अंतर्दृष्टीची परिणति अद्वैतानुभवामध्यें होते. अद्वैतानुभूति ही तत्त्वज्ञानांतील परमस्थिति होय – परमपुरुषार्थ होय. या स्थितींत अज्ञानाचें आवरण नष्ट होतें – मायेचा निरास होऊन ज्ञानसूर्याचा उदय होतो. यालाच मोक्ष किंवा मुक्त्यवस्था म्हणतात.

नवमानवाला बहिर्मुखतेचा फार मोठा रोग जडला आहे. मानव स्वतःचाच शत्रु झाला आहे. सुखसोयीसाठीं निर्माण केलेल्या वस्तूंचा तो गुलाम बनला आहे. स्वसंरक्षणासाठीं त्यानें निर्माण केलेलीं शस्त्रास्त्रें त्याच्या स्वतःच्याच नाशाला कारणीभूत होत आहेत. केवळ बाह्य सुखसोयी जोडून माणूस आनंदी होऊं शकत नाहीं याचें त्याला विस्मरण पडलें आहे. खरा आनंद अंतःस्थ आहे. बहिर्दृष्टि ठेवून त्याची प्राप्ति कधींच होऊं शकणार नाही. अंतर्मुख होऊन त्या आत्मस्वरूपाचें अथवा अंतिमसत्याचें जेव्हां तो पुनः–संशोधन करील त्याचवेळीं त्याला खरी आनंदप्राप्ति होऊं शकेल.

श्री. महादेवन यांनीं तत्त्वज्ञानाच्या मर्मस्थलीं बोट ठेवलें आहे. आधिभौतिक आणि सामाजिक जीवनामध्यें व्यक्तीची गळचेपी केली जाते तिला तत्त्वज्ञानानें दिलेलें हें अंतिम उत्तर आहे. व्यक्ति हा समाजाचा मूल घटक आहे. व्यक्तीचें समाधान, शांति किंवा आनंद केवळ समाजाच्या कल्याणावर, केवळ सामाजिक स्थैर्यावर किंवा केवळ आधिभौतिक समृद्धींवर अवलंबून असत नाहीं. व्यक्तीचें अंतरंग फोडून तपासून पाहिलें तर व्यक्तीचें समाजशास्त्रीय तत्त्वांच्या अतीत असणारें स्वरूप नीट लक्षांत येईल, व्यक्तित्वाच्या व्यापक क्षितिजांची कल्पना येईल आणि मग त्याच्या आनंदाचा ठेवा कोठें दडला आहे याचा शोध घेतां येईल.

अद्वैतवेदान्तानें अंतर्जीवनाचें हें महत्त्व ओळखलें होतें. इतर सर्व भौतिकशास्त्रांचें योग्य तें स्थान मान्य करूनहि याच आत्मसंशोधनाचें व अंतिम 'आत्मदर्शना'चें महत्त्व त्यानें पुनःपुन्हां प्रतिपादिलें आहे. त्याच तत्त्वाचा पुनरुच्चार करून श्री. महादेवन यांनीं मानवतेच्या कल्याणासाठीं झगडणाऱ्या सर्व विचारवंतांना व सेवकांना, मूलभूत व महत्त्वाच्या विचाराची पुन्हां एकदां आठवण करून देण्याचा स्तुत्य प्रयत्न केला आहे. अशाच तऱ्हेच्या मौलिक आणि मूलभूत विचारांचा प्रचार करण्यामध्यें तत्त्वज्ञान – परिषदेसारख्या संस्थांची सफलता आहे.

—

## आंबा

सोसवेना झळ आतां<br>
उग्र उन्हाची तापट<br>
मंतरल्या भावनाही<br>
होती अंमळ घामट

अशा राकट प्रहरीं<br>
आंबा अष्टांगीं फुलतो<br>
खट्या–मिठ्या कैऱ्यांवर<br>
कुरळा मोहर ढाळतो

उष्ण–चेंगटसा वारा<br>
मधूनच डोकावतो<br>
हिर्वा-कच्चा आंबा माझ्या<br>
मनांतिल पाडा येतो !

– राजा मंगळवेढेकर



अनुक्रमणिका






प्रा. भ. प्र. मोहरीर

# मर्ढेकरांच्या काव्यांतील अनुभूति व अभिव्यक्ति

मर्ढेकरांनीं मराठी कवितेंत प्रवर्तित केलेला नवकाव्य-प्रकार हा आतां कुतूहलाचा विषय राहिलेला नसून आधुनिक मराठी काव्यांतील एक विद्यमान प्रवृत्ति म्हणून तिचा निर्देश करावा लागतो. काव्यक्षेत्रांत नवे संकेत स्थिर होण्यापूर्वी कांहीं काळ अराजकाचा देखावा भासमान होतो. पण बंडाळीचे दिवस अधिक काळ टिकत नाहीत हा इतिहासाचा अपरिवर्तनीय नियम असल्यामुळे स्थैर्य व सुव्यवस्था नांदूं लागण्यास फार वाट पहावी लागत नाहीं. मराठी साहित्यांत नव-प्रवृत्तीचा आविष्कार होण्यापूर्वी इंग्रजी साहित्यांतहि तिला समांतर असणारी प्रेरणा व प्रवृत्ति विद्यमान होती. तिचा निकट परिचय नसल्यास मराठी काव्याचें मूलगामी व सर्वस्पर्शी विश्लेषण करतां येणें अशक्य आहे. या दिशेनें प्रस्तुत लेखांत पाश्चात्य व मराठी काव्यप्रपंचाच्या तौलनिक स्वरूपाचें दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केला आहे.

## आधुनिकतेचा आविष्कार

मर्ढेकर-प्रणीत नवकाव्यांत आधुनिकतेचा ठळकपणें आविष्कार झालेला आहे. यंत्रयुगानुरूप मानवी मनाची ठेवणहि बदललेली आहे. नव्या मानवाच्या वृत्ती-प्रवृत्तींचा परिचय मर्ढेकरांच्या कवितेंतून घडतो. या यंत्रयुगांत यंत्र हेंच कलेचें आराध्य दैवत बनलें आहे व कलावंतांच्या जिव्हाळ्याचा विषय झाला आहे. यंत्र हें ‘ New Millennium ’ चें प्रतीक झालेलें आहे. मानवाच्या ऐहिक मुक्ती-( Salvation ) चा तो निर्वाणीचा टप्पा झालेला आहे. मानवाचें जीवन अधिकाधिक यंत्रशरण होत चाललें आहे. मर्ढेकरांच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास मानव ‘ यंत्रमुग्ध ’ झालेला आहे. आधुनिक युगप्रवृत्तिदर्शन ( Character of modernity ) हें मर्ढेकरी काव्याचें वैशिष्ट्य मानलें पाहिजे. यंत्रयुगामुळें मानवी संस्कृतीची व मानव्याची जी राखरांगोळी होत आहे त्याचें भयानक चित्रण मर्ढेकरांनीं काव्यांतून निर्भयपणें केलेलें आहे. मानव्यावांचून विज्ञानाचा वडेजाव सर्वत्र केला जात आहे. ‘ नरांना नरमेध धन्य वाटतो ’. ‘ भांडवली वृत्ति मनांतून नष्टचर्य पिकवीत असून कामगाराहातीं करवंटीच ’ असा विदारक अनुभव मर्ढेकरांना येतो. समाजांतील कितीतरी ‘ अगण्य ’ यंत्राच्या चरख्याखालीं पिळवटले जात आहेत.

विद्यमान काळांतील प्रक्षोभ प्रगट करणें– To express the Tension of our Time –हेंच काव्याचें एक प्रयोजन समजण्यांत येतें. मर्ढेकरांच्या काव्यांत वैफल्यानुभूतीबरोबर सामाजिक अन्यायाविरुद्ध त्वेष व चीड उफाळून आलेली आहे. मर्ढेकरांनीं लब्धप्रतिष्ठितांचा दंभस्फोट केलेला आहे. भांडवलवादी मनोवृत्तीचा निषेध केलेला आहे. ‘ नंग्याचाच आतां येथें कारभार ’ असें ते म्हणतात. आणि ‘ स्त्रिया अर्धपोट जोवरि आहेत, ओंगळ समस्त आम्ही नंगे ’ ही त्यांची शापवाणी आहे. मर्ढेकरांच्या काव्यांत बुद्धिवादी मनुष्याच्या जीवनांतील वैचारिक प्रक्षोभ आहे. काव्यांत वैचारिकता येणें हा देखील यंत्रयुगाचा परिपाक मानला पाहिजे. पद्यावर गद्याचें आक्रमण झालेलें आहे. काव्यक्षेत्रांतील परंपरा-प्राप्त अभिव्यक्तीचें विघटन ( dissolution ) झालें आहे. यंत्राचा सामान्य जनांवर झालेला परिणाम दृढ व चिरस्थायी होता. मानवाच्या कल्पकतेवर, धारणा-शक्तीवर यंत्राचें आक्रमण झालें आहे. मानवकृत कलेवर यंत्रयुगाच्या संसर्गाची अनिष्ट प्रतिक्रिया झाली. कलेची जडणघडण विज्ञानाची ‘ वाट पुसत ’ होऊं लागली व कलेच्या आशयाचें माध्यम विज्ञानाची सेवा बजावीत असतांना- “ Partially formed in the service of science ”– घडत गेलें. कलेंतील आशय व अभिव्यक्ति या द्वंद्वाला येथून प्रारंभ झाला. मर्ढेकरांसारख्या आशयवादी- कवीनें या नव्या प्रयोगाची मुहूर्तमेढ केली.

मर्ढेकरांच्या काव्यांत यंत्रयुगाच्या स्पष्ट खुणा उमट-

लेल्या आहेत. त्यांना यंत्राचा ' मंत्रजागर ' ऐकूं येतो. 'काष्ठ झालेल्या मनांत ' जळीं, स्थळीं, पाषाणी यंत्रदेवाखेरीज इतरांचें दर्शन घडणें दुर्लभ. यंत्राचा महिमा मर्ढेकरांनीं मुक्तकंठानें गाइलेला आहे. सतेल तांबुस विशाल पट्टे, सैल, मऊ कातडी सिलिंडरावर वेगानें गरगर फिरतांना पाहून मर्ढेकरांनीं ' काळाचीं सालडीं पृथ्वीभवतीं प्रकाश कातींत गिरगिरत आहेत ' असें भाष्य केलें आहे. यंत्रसूक्त गातांना मर्ढेकर म्हणतातः--

' पहा, पहा ही एकतानता
तांबट-पितळी सृष्टीची ह्या
पोलादाच्या भव्य पहारी,
जरा न लवती ज्यांच्या भिंवया !
यंत्रमुग्ध अन् होउनि लावा
महालांत या धूप नि समया ! '
– ( ' कांहीं कविता. ' )

### वैफल्यभावना हा स्थायीभाव

मर्ढेकरप्रणीत कवितेंत वैफल्याचाच सर्वत्र अनुभव येतो. मर्ढेकरांचा तो स्थायीभाव आहे. मर्ढेकर आत्मानुभूतीशीं प्रांजळ व प्रामाणिक आहेत. त्यामुळें आत्माविष्कारांत झांकपाक किंवा लपवालपव नाहीं. त्यांचीं विधानें अतिशयोक्त नसतात किंवा अपर्याप्तहि नसतात. मर्ढेकरपूर्व काव्यांत स्वप्नरंजन होतें. कल्पकतेवर पोसलेली हळुवार संवेदनशीलता होती. ' One builds a romantic hope and collapses in romantic despair ' अशी भावनावादी कवींची काव्यात्म मनःस्थिति होती. मर्ढेकरांच्या कवितेंतील प्रगट व वास्तवपूर्ण अनुभूति या प्रवृत्तीला विरोधी होती. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांनीं दिलेली शिकवण आजवरच्या मूल्यांना हरताळ फांसत होती. दोन्ही महायुद्धांच्या धुमश्चक्रीमुळें नवें जग उदयाला येत होतें व कांही नव्या व लोकविलक्षण घटनांमुळे सामान्य लोक दिङ्मूढ व स्तिमित झालेले होते. दुर्भिक्ष, महर्गता, काळाबाजार, अवर्षण इत्यादींच्या तडाख्यांत सांपडून त्रस्त झालेल्या जनतेला कुणाचाच आश्रय नव्हता. वैयर्थ्यानें व वैफल्यानें भस्मासुरी अवतार धारण केलेला होता. जनतेची ' त्राहि भगवन् ' अशी स्थिति झालेली होती. विनाशाचें व विध्वंसाचें भेसूर रूप उजळ माथ्यानें वावरत होतें. अशा सर्वदूर पसरलेल्या विध्वंसकारी अराजकांतून नव्या मूल्यांची प्रतिष्ठापना झाली. टी. एस्. एलियट यांच्या कवितेतील वैफल्याची मीमांसा करतांना एका टीकाकारानें असा अभिप्राय दिला आहे — " Like Joyce, Eliot chose the one method available to him of controlling, of ordering, of giving a shape and significance to the immense panorama of futility and anarchy which is contemporary history " – ( Sense and Sensibility in Modern Poetry ' – WM. Van O'connor. ) जेम्स जॉयस् प्रमाणें टी. एस्. एलियट यानेंहि वर्तमान स्थितींत सर्वदूर प्रतीत होणाऱ्या विफलतेचें नियमन करण्याचें, संगति लावण्याचें, कलाटणी देण्याचें व तिचें महत्त्व विशद करण्याचें कार्य केलेलें आहे. मर्ढेकरांनी टी. एस्. एलियट प्रमाणेच विध्वंसकतेची ' विधायक ' बाजू दर्शविली आहे. त्यांच्या कवितेंत जीवनाचें शोकान्तक स्वरूप रेखाटण्यांत आलें आहे. ' पिपांत मेले ओल्या उंदिर ' ही मर्ढेकरांची ' कुप्रसिद्ध ' कविता म्हणजे जीवन – मरणाचें विडंबन आहे. आर्थिक विवंचनेमुळें माणसाची चाललेली कुतरओढ त्यांनी कवितेंतून रेखाटली आहे. " परिस्थितीचें ॲसिड पिऊन लिबलिबलेलीं हडकुळीं मनें " हा मर्ढेकरांचा नित्याचा काव्यविषय आहे. खालील ओळींतील विफलतेचा उद्रेक पहाः

'या जन्मांतुनि असेंच जाणें
आज उद्यांची लावित संगत
कुणि पेरावा घाम आणखी
झोडावी कुणि अखंड पंगत. '

मर्ढेकरांच्या प्रतिमाविश्वांत बीभत्सपणा येण्याचें कारण त्यांना विफलतेनें झपाटलें आहे. त्यांच्या मनाच्या आंतरिक विश्वांत ही जाणीव तांडव नृत्य करतांना आढळते. मर्ढेकरांची विफलता ही विकृति आहे. तिचा आविष्कार काव्यांतून होतांना मर्ढेकरांची मर्यादा जाणवते. मर्ढेकरांच्या कविमनांवर ' उगीचतेची ' झांपड पडलेली आहे. त्यांच्या कल्पकतेला ती चाळवत आहे. त्यांच्या संज्ञेशीं ती पूर्णपणें एकरूप पावली आहे. त्यांनींच म्हटलें आहे. —



अनुक्रमणिका






‘ उगीचता वेंधळी कोंबते
काळाच्या पिशवींत झांवळ्या
जिथे पिकावा नारळ तेथे
टोपलींत कुणि भरी मासळ्या
गळ्यागळ्यांतुन सूर उसळतो
उरांत लटके उलटें वाघुळ
खळीखळींतुन हसतो गाल
कवटिंत उगवे खुरटा बाभुळ. ’

मर्ढेकरांच्या कवितेंतील प्रतिमा-चित्रण बोलकें व आशय-पूर्ण आहे. नवा मानव व त्याच्या समस्या त्यांच्या कवितेंत रंगविलेल्या आहेत. आजचा मानव पराभूत झालेला आहे. तो कसाबसा जगतो ( less living ) आहे हें एक विदारक सत्य आहे. मानवाच्या परंपरा निर्मूल झालेल्या आहेत. मानवा-मानवांनी निर्मिलेल्या समाजाची नैतिक बाजू ढासळ-लेली आहे. त्याचीं जीवन-मूल्यें बदलत आहेत. ह्या सर्वव्यापी विनाशाचें भेसूर चित्र नव्या कवितेंत आढळतें. आजच्या मानवी संस्कृतींतील जीवन हें जिवंत मरणाप्रमाणें आहे. ( “ What we have in this civilization is not life but a kind of death-in-life ” )

नव्या कवितेंत विफलतेप्रमाणें अभावात्मकतेची ( Negationची ) दुसरी बाजू आहे. हळुहळु नाम-शेष होणाऱ्या मूल्यांचें हें जग आहे. पण मूल्येंच अस्तित्वांत नाहींत असें समजणें म्हणजे मूल्यें आहेत अशी affirmation ची ग्वाही देणेंच होय. ज्या पोकळींत सारी संस्कृति गडप होणार आहे ती भरून काढण्याकरितां दिव्य प्रतिभेची गरज आहे कारण संस्कृतीचें सारें स्वरूप तींत एकवटलेलें असणार :– “ All the same, negation predominates; thus in an age of reduced values to assert that there are no values is an affirmation of values. The void with which a civilization ends can be filled with a vision which is a sum of all phases of the civilization ” (‘ Making of Poetry ’ –Spender. )

## एकाकी व्यक्तित्वाचे पडसाद

नव्या कवितेंत कवीच्या अनुभूतीचें आंतरिक विश्व सामावलेलें आहे. जगाचीं दोन विश्वें कल्पिलीं तर बाह्य व आंतरिक विश्वांच्या मधोमध मनुष्य उभा असतो. तो आपल्या वृत्ती ( Mood ) प्रमाणें व मनाच्या ठेवणीप्रमाणें कोणत्या तरी एका विश्वाविषयीं अधून मधून श्रद्धा व दुसऱ्याविषयीं अश्रद्धेची भावना बाळगीत असतो. श्रद्धेय व अश्रद्धेय या दोहोंतील संघर्ष सतत चाललेला आहे. दोन संप्रदायांतील ( creeds ) मधील कलह असें आजच्या संघर्षाचें स्वरूप नसून ते श्रद्धा ( believing ) आणि अश्रद्धा ( not believing ) या मधील झगडा असून आजच्या मानवाच्या मनांतील मुख्य वादप्रश्न तोच आहे. श्रद्धावंतांनीं मानवाला काव्यांत केन्द्र-स्थानीं ठेवलें आहे. स्वतःच्या श्रद्धाविषयांबाबत प्रामा-णिकपणा बाळगणें हा कवीचा बाणा असतो. कवि अंतर्मुख राहून आत्मशोधन करीत असतो. याचें पर्यव-सान क्वचित् एकांतिकतेंत होतें. कधी कधी कवि परा-कोटीचा आत्मप्रवण होऊन त्याची अनिष्ट प्रकारांत परिणति होते. अमेरिकेंत तर कलावंताच्या अंतर्मुख-तेचीं आत्मघातकी कृत्यें बहुसंख्येनें घडतात ( “ It is the particular tragedy of American Art that our most sensitive poets exile or kill themselves. ” ) ( ‘ What It meant to be a poet in America’–Lindsay) याच्या उलट, एकांताचा व विजन वृत्तीचा परिणाम काव्यरचनेवर बहुधा उप-कारक होतो. आधुनिक कलेची निर्मिति व जोपासना आत्मरतींतून झालेली आहे व पृथक् राहूनच कला-वंताला कलेचें बहुमोल समाधान लाभलें आहे. नव्या कवींत ही एकांतप्रियता आहे. त्यांतूनच त्यांच्या व्यक्तित्वाच्या कडा आणि पैलू उजळले आहेत.

मर्ढेकरांच्या एकाकीपणाचा उगम त्यांच्या मनस्वी आत्मनिष्ठेंत आढळतो ते म्हणतात –

‘ भटकत फिरलों भणंग आणिक
मिळेल तेथे पाणी प्यालों
जुळेल तेथे खूण जुळविली
तरि होतों हा तसाच उरलों. ’

‘ कुबड्या एकांता’ची ओळख मर्ढेकरांनी अनेकवार








करून दिलेली आहे. गोंधळलेल्या, चिंचोळ्या गिरगांवांतील गल्लीमध्यें चाललेल्या चिमण्या अंधाराचें 'पुसट प्रबोधन' त्यांच्या कवितेंतून ऐकायला मिळतें. मनांतल्या पातकांचे तयार होणारे 'क्रिस्टल' आणि जिभेवर रेंगाळणारी शेलकी शिवी हा मानवाचा जन्मसिद्ध अधिकार ते कायम टिकवतात. सुखदुःखाचे गळे कापून वर्षांवर्षांनीं मळे पिकविले, व जुनाच भाकड-कडवा कुड्या मनाची रवंथ काढीत बसला आहे, रित्या मनांतील भकासतेला वीज-दिव्याचें चिलखत होतें, तें गेल्यानंतर 'पंचशव्यगर खजिल अगाचें' हें नवें कवच-कुंडल कां दिलें आहे असा प्रश्न ते टाकतात. स्नायूंचा पीळ तुटतांना व घामाचें पेंव फुटल्यावरसुद्धां 'जवान आहोंत' ही लाज वाटण्याचीसुद्धां फुरसत नसते. खुज्या मनाच्या रुळावर कृमि आणि अळ्या वळवळतांना दिसतात. इच्छेच्या गल्लींत आशेचा श्वान नेहमी भुंकतांना दिसतो. अंतर्याम अंधारल्यावर क्लोरोफॉर्म दिल्यामुळें शक्ति असून सर्व निपचित झालें आहे. इच्छेची काया मस्तल्यानंतर ईर्ष्या, अहंता, असूया, इंजेक्शनच्या सुईप्रमाणें बोचूं लागलीं आहेत.

मर्ढेकरांच्या प्रतिमाविश्वांत एकप्रकारचा असहायपणा आहे. सामाजिक संबंध तोडून टाकल्यानंतर मनांत एकाकीपणाचा भाव गदगदत आहे. अतृप्तीमुळें वासना खवखवत आहेत, व भावनांना मरगळ आलेली आहे. भयानकतेच्या बुरजावरील अनामिक शीळ त्यांना ऐकूं येत आहे. मर्ढेकरांच्या ऋचांचें सूक्त असें आहे:

> 'अशा येथल्या संसारांत
> जगण्याचाही चुकला पाढा
> आणि शेवटी परिस्थितीचा
> गळ्याखालतीं उत्तरें काढा

कवि एकांतिक व एकटा असा रहातो. त्याचीं मूल्यें प्रचलित सामाजिक मूल्यांपेक्षां निराळीं असतात. त्याच्या वृत्तीला व काव्यवृत्तीला एक उपरोधाची धार येते. वर्ड्स्वर्थ, कोलरीज, कीटस्, शेले आणि बायरन् हे स्वतःला; थोड्याफार प्रमाणांत बहिष्कृत- "out-cast" समजत असत. वर्डस्वर्थ 'desolate-minded man' होता. शेली समाजाला 'hellish society of men' म्हणत असे. तर कीटस्‌ची आत्महत्या निराशेच्या झटक्यांतून उद्भवली. 'Ideal' आदर्शाचा Real नें वास्तवानें केलेल्या पराभवाचें प्रतीक म्हणजे त्याची आत्महत्या होय. बुद्धि आणि अनुभूति या दोहोंत तफावत पडते. अनुभूतीला व कल्पकतेला कित्येक गोष्टी बिनबोभाट स्वीकाराव्या लागतात. परंतु बुद्धीला तसें करणें वेडगळपणाचें वाटतें. बुद्धिप्रधान व सुसंस्कृत माणसाला उद्योगप्रधान समाजांत शहाजोगपणानें जगणें अशक्यप्राय होऊन जातें. श्वार्टझ् (Schwartz) म्हणतो— "There was no room in the increasing industrialisation of the society for such a monster as the cultivated man; a man's taste for literature has at best nothing to do with most of the activities which constitute daily life in an industrial society."

हेन्री जेम्स, एझ्रा पौंड आणि टी. एस्. इलियट यांच्यासारखे कवी बहिष्कृत होतात असें नव्हे तर समाजानेंच काव्य, कला, संवेदनशीलता, कल्पकता यांवरच बहिष्कार घातलेला असतो. प्रत्यहींच्या जीवनाचा आपल्या कलेंतून आविष्कार व्हावा ही मनीषा बाळगणाऱ्या कलावंताच्या कलेंत वैफल्य, पराभूतपणा आढळावा यांत नवल तें काय ? त्यादृष्टीनें टी. एस्. इलियटच्या काव्याविषयीं एका टीकाकारानें काढलेले खालील उद्गार विचारार्ह वाटतात – "A related theme is that of dehumanisation. The vulgarity and cold sensuality and the mild hysteria and frustration evident in so many of Eliot's characters symbolise the plight of the individuals who are unable to find purpose or direction in their lives. Without a tradition which defines ideals and values, most individuals are unable to define their personality or to maintain the strong sense of personal identity – The loss of respect for the concept and the person of man is



अनुक्रमणिका








the inevitable counterpart of the decline of values and ideals."

"अमानुषीकरणाची प्रक्रिया या संबधांत पहाण्यासारखी आहे. ईलिअटच्या पुष्कळ पात्रांच्या ठिकाणीं असंस्कृतपणा, कामुकता, मनोविकृति आणि वैफल्य या गोष्टी दिसून येतात त्या हल्लींच्या समाजांतील व्यक्तींचीं प्रतीकें आहेत. या व्यक्तींना आपल्या जीवनांत निश्चित ध्येय व दिशा सांपडलेली नाहीं. ध्येयें व मूल्यें निश्चित करून देईल अशी परंपराहि आज राहिलेली नाहीं. त्यामुळें बहुतेक माणसांना आपल्या व्यक्तित्वाचाच सुगावा लागत नाहीं, आपल्या व्यक्तित्वांत निश्चित असें एक सूत्र कोणतें याची जाणीवहि नसते. अशा प्रकारें एका बाजूनें ध्येयें आणि मूल्यें यांचा ऱ्हास होत आहे, तर दुसऱ्या बाजूनें त्याचाच पर्याय म्हणून, मानवांच्या व्यक्तित्वाबद्दल, मानव या उदात्त कल्पनेबद्दल आदरभावना मावळली आहे."

## विडंबन, उपरोध व उपहास

मर्ढेकरांच्या कवितेचा उपरोधप्रचुरता हा महनीय विशेष आहे. जगाकडे व जीवनाकडे पाहाण्याचा नवकवींचा दृष्टिकोन उपरोधकाचा ( ironist ) आहे. आदर्श ( ideal ) व वास्तव ( real ) या दोहोंत समतोल नसला कीं त्या उपरोधाची उपयुक्तता पटते. कवितेंत उपरोधप्रवृत्तीचा प्रवेश होण्याचीं कारणें दोन असतात. ( १ ) मध्यम वर्गीय पांढरपेशांची मनोवृत्ति ठराविक अशी बनून गेल्यामुळें नैतिक, कलात्मक, मूल्यांकडे लक्ष देण्यास त्यांना सवड होत नसते. व्यावहारिक बाबींवर त्यांचें लक्ष केंद्रित झालेलें असतें. साहजिकच त्याचा परिणाम कलावंतावर होतो. तो त्यांच्याकडे उपहासाच्या चष्म्यांतून पाहूं लागतो. ( २ ) त्यांची मानसिक शक्ति इतकी अधू झालेली आहे कीं, मूल्यविषयक अंतिम निर्णय घेऊं शकत नाहींत. मानसशास्त्र, वंशशास्त्र इत्यादि सापेक्षतावादी शास्त्रांनीं स्थिर मूल्यांचें – stable values – चें महत्त्व कमी मानलेलें आहे. उपरोधामुळें कोणतेंहि निश्चित विधान न करण्याची मुभा मिळते. विल्सन ओ. क्लोनें उपरोधाची irony ची व्याख्या करितांना तिच्या वैशिष्ट्यावर नेमकें बोट ठेवलें आहे. ("Irony is a form of allegory, thinking one thing aud saying another") 'उपरोध म्हणजे मनांत एक व ओठांत एक असा प्रकार होय.'

मर्ढेकरांत हा उपरोधगुण होता. त्याचें स्वरूप विडंबनाचें आहे. "संत शब्दांचे नायक, संत अर्थाचे धुरंधर, एक शब्दाचा किंकर, डप्फर मी" हे उद्गार आत्मलक्षी खरे पण त्यांत उपरोधाचा विषार आहे. ऐकाल तर ऐकून घ्या नाहींतर काळा वरती आहेतच, ही शरणागति मर्मभेदक आहे. दातीं तृण धरून 'हुजूर' म्हणून धावपळ करणाऱ्या अनामिकांची करुण कथा तर हृदयद्रावक आहे. 'मुकेकंगालिस्तान झिंदाबाद' ही मर्ढेकरांची घोषणा आहे. 'दोन खोल्यांच्या बिऱ्हाडांत माझा मीच वऱ्हाडी झालों' आहे. तलम पारदर्शी वसनांत ढेरपोट्या ताणून देतो व आंधळा लक्तरें मिरवीत अंधारांत चांचपडत असतो. जगाची विषमतापूर्ण रहाटी पाहून मर्ढेकरांचें उद्गार किती मर्मभेदी वाटतात!

'सत्तेचें तूप सत्तेचीच पोळी
मानव्याची होळी भाजाया ती
देवा, ऐशी भूक कासया दिलीस
झालों कासावीस मीहि नंगा
नंग्याचाच आतां येथे कारभार
कोंडी आरपार फोडाया ही'

या उद्गारावरून मर्ढेकर विश्वद्वेषी ( cynic ) असावेत असें वाटतें. त्यांच्या उपरोधाचें स्वरूप या विधानांवरून स्पष्ट होण्यासारखें आहे. ( Irony thus shades into cynicism. As such it is committed to the view that everything is wrong in the worst of all possible worlds. Irony need not be thus committed–it may be a mode of operation which has a secret alliance with positive goals." Sense and Sensibility in Modern Poetry )

मर्ढेकरांच्या विडंबनांत विदूषकीपणाहि आहे. 'धम्मम् सरणं गच्छामि' वर त्यांनीं 'सरण' रचलें आहे. 'उघडि नयन रम्य निशा' या ओळींत त्यांनीं 'मिशा' आणल्या आहेत. जुल्मी डोळ्यांत त्यांनीं 'फिल्मी' धुंद आणली आहे. त्यांच्या कवितेंतील खरी










रात्र पंक्चरते. अरुणोदयाच्या समयीं गिरिणोदयाची पहाट फुटते. याच कवितेंतील ' कुत्रापि पतितं तोयं यथा गच्छति सागरम् । सर्वचक्रभ्रमस्कारं मालकं प्रति गच्छ-ति' हे उद्गार केवळ उपरोधांत न मोडतां स्थायी वैफल्य-भावनेचा व एका मनोविकृतीचाच परिणाम असावा असें वाटूं लागतें. " Indeed certain forms of irony, romantic irony and cosmic irony, as well as the constant air of ennui or of whimsical amusment should, it seems be categorised under, some heading other than irony. They express a negative impulse and themselves invite redicule. They spell frustration and megalomania " – Sense and Sensibitlity ) आजची कला ही यथार्थवादाची विरोधक आहे. आधुनिक कलेंतील आत्माविष्कार, प्रतीकवाद ( symbolism ), प्रतिमावाद ( impression-ism ), अतिवास्तववाद ( surrealism ) या वादांच्या रूपानें अभिव्यक्त झाला. यथार्थवादाची ( verismची ) ती प्रतिक्रिया होय. गद्याशीं सहयोग ( compromise with the prose )करण्याची प्रेरणा या प्रतिक्रियेंतून निर्माण झालेली आहे.

इलियटसारख्या आधुनिक कवींनीं नव्या काव्य-प्रयोगांतून नवी काव्यप्रणाली प्रसृत केली. अभिव्यक्तीचे निर्बंध शिथिल झाले व वाचकांच्या संज्ञाशक्तीला व ग्रहणशक्तीला मुक्ततेचा अनुभव घेतां आला – नव-काव्यप्रयोगाकडे व अभिव्यक्तीकडे पाहून नवी काव्या-नुभूति येऊं लागली. याचा परिणाम गद्याप्रमाणें स्वैर लेखन करण्यांत जरी होऊं लागला, तरी उथळ भावना-वादाच्या आहारीं गेल्यामुळें आशयशून्य काव्यरचनेला पायबंद बसला हा मोठा लाभच मानला पाहिजे.

मर्ढेकरांनीं ' आशयाच्या स्वामीला ' शब्दवाही म्हणून प्रार्थिलें आहे. नव्या कवींची कविता त्यामुळें गद्यप्राय झाली आहे. मर्ढेकरांची रचना तर पुष्कळच दुर्बोध वाटते. कित्येक शब्दांचीं रूपें व सामासिक रूपें अपरिचित वाटतात. त्यामुळें त्यांच्या काव्याचा दुर्बोधपणा हा टीकेचा प्रमुख विषय झालेला आहे. खालील रूपें बानगीदाखल देतां येण्यासारखीं आहेत. भावना-भाजन, भाव-यक्तृत् , रात्रपापणीचे केस, चीड-झेंडे, नश्वरतेचें मखर, हाकशिट्टी, आशेची वात, आशेचें तूप, मानव्यमिलिंद, सत्तेचें तूप, सत्तेची पोळी, इच्छेची गल्ली, सत्याची निशा, दोंद – तबेला, वीजदिव्याचें चिल्खत, भाकड-कडबा, बेतांचें पुडकें, सागराचा भंगी, डोक्याचा डमरू, सागर-पक्षी, क्षण – बार इत्यादि.

मर्ढेकरांच्या काव्यांतील दुर्बोधतेची मीमांसा स्टिफन स्पेंडरच्या पुढील विधानावरून करतां येण्यासारखी आहे. ऑडेन हा दुर्बोध कवि आहे या विधानाला उत्तर देतांना स्पेंडर म्हणतात – " Mr. Auden is obscure, but his obscurity is of an intellectual kind, it arises through the compression of an idea or as the result of some private reference, which is inadequately explained. " ('Making of a Poem ' – S. Spender ) ( ऑडेन याची दुर्बोधता बौद्धिक पातळीवरील आहे. ते कल्पना ज्या अत्यंत संक्षिप्त सूत्ररूपानें मांडतात व आपल्या ज्या व्यक्तिगत अनुभूतीला अभिव्यक्ति देतात. त्यांतून त्यांच्या दुर्बोधतेचा उगम आहे. ) मर्ढेकरांचें शब्दसामर्थ्य मोठें होतें. काव्याच्या माध्यमा-विषयींच्या त्यांच्या समजुती अपवादस्वरूपच मानल्या पाहिजेत. आशयानें परिपूर्ण असलेल्या आपल्या कवि-तेला त्यांनी घातलेलें विनयाचें आवरण मोठें मोहक आहे. संतांच्या शब्दपरंपरेचा अभिमान बाळगत, ' शब्द अर्थाआधीं यावा, हें तो ईश्वराचें देणें ' मानीत, त्यांनीं ' काळयावरती पांढरें ' केलेलें आहे व पामराच्या बाराखडीचा अल्पस्वल्प प्रयोग सादर केलेला आहे —

काय गा म्यां पामरानें
खरडावी बाराखडी
आणि बोलावीं उत्तरें
टिनपाट वा चोमडीं
कधी लागेल का नख
तुझें माझिया गळयाला
आणि सामर्थ्याचा स्वर
माझिया या व्यंजनाला.








श्री. सोपानदेव चौधरी

# कै. बा. सी. मर्ढेकर : कांहीं आठवणी

" अरे असं अंडाकृति काय बोलतोस ? त्रिकोणी बोल !"

फैजपूर येथील इंग्रजी शाळेच्या आवारांत कांहीं विद्यार्थ्यांचा संवाद चालला होता. त्यांतील एक चुणचुणीत विद्यार्थी शिक आल्यागत चेहरा करून बोलला आणि आपली रिंग फिरवित ऐटीनें निघून गेला. इतर विद्यार्थी त्याचेकडे टकमकां पहायला लागले. ह्या बोलण्याचा अर्थ त्यांना कळला नसावा असें स्पष्ट दिसून आलें. मीमात्र त्यांतील मथितार्थ जाणूं शकलों. त्या वेळीं जळगांव येथें मी इंग्रजी दुसऱ्या इयत्तेंत शिकत होतों. यात्रेच्या निमित्तानें फैजपूर येथें मित्रमंडळीबरोबर आलों होतों. यापूर्वी मी फैजपूर कधीं पाहिलें नव्हतें. राजगिऱ्याच्या पिठाची फक्की तोंडांत टाकून 'फैजपूर' या गांवाचा उच्चार केला म्हणजे तोंडांतील सर्व पीठ उडून जातें हेंच काय तें या गांवाचें वैशिष्ट्य मला माहीत होतें. अंडाकृति आणि त्रिकोणी बोलणारीं त्रिकोणी मुलें येथें असतील याची मला कल्पना नव्हती.

त्यानंतर दुसऱ्या वर्षाची गोष्ट. मी ज्या शाळेंत शिकत होतों त्या आमच्या जळगांव येथील न्यू इंग्लिश स्कूलच्या इन् मिन् तीनच इयत्ता होत्या. तिसरीची परीक्षा पास होऊन तेथील सरकारी जी. एस्. हायस्कूलमध्यें प्रवेश मिळविणें म्हणजे मोठी बहादरी समजली जात असे. जळगांवच्या पंचक्रोशींतील तुरळक अशा तालुक्याच्या गांवीं अगर बाजारपेठेच्या इतर गांवीं तिसऱ्या इयत्तेपर्यंतच शाळा होत्या. जी. एस्. हायस्कूलमध्यें प्रवेश मिळविण्याकरितां तिसऱ्या इयत्तेंतील विद्यार्थी परगांवाहून येत असत. सालाबादप्रमाणें त्या वेळीं फैजपूर येथील इंग्रजी शाळेचे विद्यार्थीहि आले होते. जी. एस्. हायस्कूलच्या भव्य इमारतींत परीक्षा चालू होत्या. मी ज्या बेंचवर पेपर लिहीत बसलों होतों, त्याच्या बाजूलाच दुसऱ्या बेंचवर एक गौरवर्णीय विद्यार्थी मोठ्या टापटिपीनें पेपर लिहीत बसला होता. माझ्याप्रमाणें इतर विद्यार्थ्यांचेंहि त्याच्याकडे लक्ष वेधत असल्याचें मला कळून आलें. लिहिणें थोडें परंतु कपड्यावर शाईचे डागच फार ! अशा विद्यार्थ्यांना तर त्याच्याबद्दल विशेष कुतूहल वाटलें. त्याची ती जांभळ्या मखमालीची जरतारी टोपी आणि हिरव्या बनातीचा कोट. पोषाखांत जसें वैशिष्ट्य दिसून आलें, तसें चेहऱ्यावर बटमोगरीच्या फुलाची टवटवी परंतु त्यामधें अबोलीचें अबोलपण.

डोळ्यांत तेल घालून सुपरव्हिजन करणारे शेंडे सरहि त्याचे जवळ उभे राहून कौतुकानें नजर फिरवीत असल्याचें आढळून आलें. " इंग्रजी तिसरींत असलेल्या या विद्यार्थ्याचें इंग्रजीचें ज्ञान मॅट्रिकमधील विद्यार्थ्याच्या ज्ञानाइतकें आहे. असें पेपर संपल्यानंतर हळूंच माझ्या कानांत कुणीतरी सांगितलें. त्याला मी विचारलें " कोणरे हा ? कुठेंतरी पाहिल्यासारखा वाटतो " एका विसरलेल्या गोष्टीचें स्मरण करीत मी त्याला प्रश्न केला. "अरे फैजपूरचा बाळू मर्ढेकर !" मी मनांतच म्हणालो "होय, तोच तो ! अंडाकृति कां बोलतोस ? त्रिकोणी बोल" असा प्रश्न करणारा तोच तो हा बाळू मर्ढेकर !

इतक्या बुद्धिमान् मुलाचें आडनांव " मर्ढेकर असावें " याबद्दल मात्र मी मनांतल्या मनांत हळहळलों. आमच्या खानदेशांतील चौधरी–पाटील, कुलकर्णी–जोशी, देशमूख – देशपांडे इत्यादि आड-










नांवांच्या कवीलयांत ' मर्ढेकर, हें आडनांव अर्थातच चाकोरीबाहेरचें आणि जरा विचित्र वाटलें, परंतु बुद्धीनें नामाचा महिमा वाढविला. मर्ढेकर हें आडनांव बुद्धिमत्तेचें प्रतीक वाटूं लागलें.

परीक्षेच्या त्या सातआठ दिवसांत इतर विद्यार्थ्यां-पेक्षां माझी आणि बाळू मर्ढेकराची बरीच गट्टी जमली. मर्ढेकर हा वृत्तींनें अबोल व मी मुलुखाचा लाजाळू ! इतर विद्यार्थ्यांना या गोष्टीचें फार आश्चर्य वाटल्याचें दिसून आलें. पेपर संपल्यानंतर हायस्कूल लगतच्याच शेतांत एका कडूनिंबाच्या झाडा-खालीं आम्हीं गोड गप्पागोष्टी केल्या. मधल्या सुट्टींतील तो दररोजचाच कार्यक्रम होऊन बसला. त्या गप्पागोष्टींपैकीं कांहीं अजून माझ्या स्मरणांत आहेत. तापी - गिरणा, वाघूर-पूर्णा या नद्यांव्यतिरिक्त खानदेशांतील बहुतेक नद्या पावसाळ्यांतदेखील आटतात. पूर येतो अन् वाळू ठेवून निघून जातो. " खानदेशमधें पाण्याच्या नद्यांपेक्षां वाळूच्या नद्याच फार ! " असा एक आमचा ठळक शोध मला आठवतो. वाघूर नदीचें खरें नांव वागीश्वरी असावें. वागीश्वरी, वाघूरी, वाघूर, अशी एक व्युत्पत्तीहि आठवते. वाघूर नदी अजिंठ्याच्या लेण्यांतून उगम पावते, या भौगोलिक ज्ञानावरून इतक्या कलात्मक उगमाच्या नदीला वाघूर या उग्रट नांवानें कां उल्लेखितात ? असा त्यानें मागें एक प्रश्न केला होता. परंतु या वागीश्वरी नदीचा उगम आधी कां अजिंठ्याच्या लेण्याचा जन्म आधी ? असा माझा एक सरळ सवाल होता !

जळगांवजवळच कानळदें या गांवापासून एक-दोन मैल अंतरावर " अवचित हनुमान, " या नांवाचें समर्थ रामदास स्वामी यांनीं स्थापन केलेलें एक देवस्थान आहे. या देवस्थानाचा मोठा मजे-शीर इतिहास आहे. तें स्थान पाहण्यासाठीं जावें असा आमचा विचार ठरला होता परंतु तें जुळलें नाहीं. समर्थ रामदास-स्वामींबद्दल त्याच्या मनांतला भक्तिभाव मात्र मला उत्कटतेनें दिसून आला.

आमच्या परीक्षा संपल्या. शेंकडा तीस-पसतीस विद्यार्थीच त्यावर्षी पास झाले. त्यापैकीं (१) बी. एस्. मर्ढेकर (२) एस्. एन्. चौधरी (३) के. के. जोशी या आम्हां तिघां विद्यार्थ्यांनाच जी. एस्. हायस्कूलध्यें प्रवेश मिळाला. परंतु बाळू मर्ढेकर हा जळगांव येथील हायस्कूलऐवजीं सोईच्या दृष्टीनें धुळें येथील गरुड हायस्कूलमध्यें शिकावयास गेला. फैजपूरहून त्याचीं मला एकदोन पत्रें आलीं होतीं, परंतु तीं आतां उपलब्ध नाहींत याबद्दल मला फार वाईट वाटतें. त्या पत्रांतील कांहीं सारांश मात्र माझ्या स्मरणांत आहे. पत्रें साधींच परंतु त्यांत देखील चिंतनशील वृत्ति आणि ठराविकतेला टोकर मारणारें असें वैशिष्ट्य होतें. पत्रें पाठविण्याच्या बाबतींत मी पहिल्यापासूनच आळशी असल्यामुळें आमचा मैत्रीचा संबंध अधिक न वाढतां तो तुटत गेला.

असहकारितेच्या सुरुवातीचे ते दिवस होते. माझी पुढील वार्षिक परीक्षा संपल्यानंतर महात्मा-गांधींच्या संदेशानुसार मी सरकारी हायस्कूल सोडलें आणि जळगांवच्याच राष्ट्रीय शाळेंत दाखल झालों. सरकारी शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वाऱ्यालाहि उभें राहूं नका असें आमच्या गुरुजींनीं सांगितलें होतें. सरकारी शाळेचे विद्यार्थी म्हणजे त्यावेळीं देशाचे शत्रु ना ! अंगांत देशभक्तीचें वारें संचारलें होतें. त्याला कोण काय करणार ? " लागली आग देशाला चला रे चला विझविण्याला " हें गीत गातां गातां आम्हीं परदेशी कपड्याच्या होळ्या पेटवीत होतों. स्वतःच्या शिक्षणाची होळी मात्र त्यावेळीं दिसत नव्हती.

सहा सात वर्षें लोटल्यानंतर मी नाशिक येथें पं. विष्णु दिगंबर यांच्या गांधर्वमहाविद्यालयांत संगीत शिक्षणासाठीं आलों. १९२७ च्या जानेवारींत किंवा फेब्रुवारींत नाशिकचे कवि वनवसंत ( पु. वि.








१९३२ सालीं पुणें येथील पहिल्या कवि संमेलनापासून लोक मला कवि म्हणून ओळखूं लागले. १९३६ सालीं फर्ग्युसन कॉलेज व एस्. पी. कॉलेजच्या निमंत्रणावरून काव्यगायनानिमित्त मी पुण्याला सहकुटुंब आलों होतों. कार्यक्रम आटोपल्यानंतर माझा दीड वर्षाचा मुलगा चि. मधू एकाएकीं आजारी पडला. आम्हांला जवळ जवळ दीड महिना डॉ. भडकमकरांच्या औषधोपचारांसाठीं रहावें लागलें. एकदां मी प्रा. वामन मल्हार जोशी यांचेकडे गेलों असतांना आदल्या दिवशींच मर्ढेकर येऊन गेल्याचें पू. तात्यासाहेब जोशी यांनीं सांगितलें. मर्ढेकर उतरले कुठें ? — हे विचारायलामात्र मी विसरलों. परंतु योगायोग असा कीं मी ज्या ठिकाणीं रहात होतों, त्याच्या खालच्याच ब्लॉकमधें फर्ग्युसन कॉलेजचे प्राध्यापक एन्. व्ही. वैद्य रहात असत. त्यांचेकडेच मर्ढेकरांचा मुक्काम होता. मी वर रहातों असें प्रा. वैद्यांनीं माझ्याबद्दल सांगतांच बाळू मर्ढेकर माझ्याकडे पायरागत धांवत आला. बाळूची व माझी भेट झाली. आतां बाळू कसें म्हणायचें ? बाळासाहेब मर्ढेकरांची सोळा वर्षांनीं भेट झाली. अप् टु डेट पोषाख केलेल्या बाळासाहेबांमध्यें जांभळी जरीची टोपी आणि हिरवा कोट घातलेला बाळू मर्ढेकर पाहतां पाहतां मी माझी स्वतःची बरीच करमणूक करून घेतली !

जेवणखाण झाल्यानंतर दिवसभर आम्हीं खूप गप्पागोष्टी केल्या पू. तात्यासाहेब जोशी यांच्याबद्दल आणि त्यांच्या साहित्याबद्दल त्यांना फारच आदर होता असें दिसलें. आणखी कांहीं इतरत्र गप्पागोष्टी झाल्यानंतर, इंग्लंडला ते जाऊन आल्याची, मी गोष्ट काढली. त्यावेळीं बाळासाहेब जरा गंभीर झाल्यासारखे वाटले. आय्. सी. एस्च्या परीक्षेंत त्यांना आलेलें अपयश ही आश्चर्यजनक बातमी आणि डोक्यावरील कर्जाचें ओझें ही वस्तुस्थिति मला कर्णोपकर्णी माहिती होती. तरी पण सहज कुतूहलानें मी विचारलें.

रहाळकर ) यांचेकडे बालकवींच्या चरित्रासंबंधीं माहिती गोळा करण्यासाठीं बाळू मर्ढेकर पांचसहा दिवसासाठीं राहून गेल्याचें मला मागाहून कळलें त्यावेळीं नाशिक येथें मी नवीनच होतों, कुणाशीं परिचय नव्हता. त्यावेळीं कवि वनवसंत माझ्या परिचयाचे असते तर मर्ढेकरांच्या भेटीचा योग खात्रीनें आला असता. मला फार वाईट वाटलें.

कांहीं महिन्यानंतर त्याच वर्षी सिंहगड पाहण्याच्या निमित्तानें मी पुण्यास गेलों. कांहीं जुन्या मित्रांना भेटावें म्हणून फर्ग्युसन कॉलेजच्या वसतिगृहांत गेलों. महाजन नांवाच्या माझ्या एका मित्राला भेटायचें होतें. पुण्याला माझें कुणीच परिचयाचें नसल्यामुळें त्यानें मला दोन दिवस ठेवून घेतलें. बाळू मर्ढेकर तिथेंच राहतो असें मला कळलें. परंतु त्या दोन तीन दिवसांत तो कुठेंतरी बाहेर गांवीं गेल्याचें मला समजलें. मर्ढेकराच्या शेजारील खोलीमधें वेडेकर या नांवाचा एक हुषार विद्यार्थी रहात असे. वयाच्या चवदाव्या वर्षी मॅट्रिकची परीक्षा पास झालेला हेंहि त्याचें वैशिष्ट्य होतें. महाजन त्याला कौतुकानें टिल्ल्या वेडेकर म्हणून उल्लेखीत असे. आजचे ख्यातनाम साहित्यिक नवटीकाकार प्रा. दि. के. बेडेकर ते हेच ! यावेळींहि मर्ढेकरची व माझी भेट होऊं शकली नाहीं. सिंहगड पाहिल्यानंतर मला घाईनेंच नाशिक येथें परतावें लागलें.

१९२८ सालीं बी. ए. ची परीक्षा पास झाल्यानंतर मर्ढेकर आय. सी. एस्. च्या परीक्षेसाठीं विलायतेला गेल्याचें माझ्या कानावर आलें. मला त्यांत विशेष असें कांहीं वाटलें नाहीं. कारण मर्ढेकरासारखा हुषार आणि महत्त्वाकांक्षी विद्यार्थी परिस्थितीवर मात करून विलायतेला जाणार याबद्दल मला खात्री होती. अशींच आणखी सहा सात वर्षे निघून गेलीं. अधून मधून मला मर्ढेकरची आठवण येत असे एवढेंच !

" बाळासाहेब, आय्. सी. एस्. च्या परीक्षेंत घोडें कुठें अडलें ? "

त्यावर ते निराशेनें हंसून म्हणाले " घोडें अडलें असतें तर बरें झालें असतें. परंतु रायडिंगच्या परीक्षेंत त्या घोड्यानें मला पाडलें ! " चालू विषय बदलण्याची त्यांची ती चर्या होती.

" एका उमद्या जनावरानें एका बुद्धिमान् तरुण माणसाला नाउमेद करावें — " हा माझा विनोद तोंडांतल्या तोंडांतच राहिला. कपाळावर आलेले केंस बाळासाहेबांनीं मागें सारतांच मीहि इंग्लंडच्या गोष्टी साती समुद्राच्या पार भिरकावून दिल्या आणि खानदेशच्या गोष्टी बोलूं लागलों. तेव्हांमात्र बाळासाहेब खुषींत आल्याचें दिसलें. त्यांनींहि मोठ्या आनंदानें मला साथ दिली. शाळा हेंच घर समजून राहणारे आणि जिव्हाळ्यानें शिक्षण देणारे फैजपूरचे शिवराम गुरुजी, सर्व जगाशीं पत्रव्यवहार करणारे आसोद्याचे द. ग. काळे, फार काय, नफा आणि तोटा यांचा समतेनें सत्कार करून बिडी पीत पीत व्यापाराची महती गाणारा, आणि आपल्या लूथ लागलेल्या पगडीचा मरतुकडा तुरा हालवीत मनांत मनोरे बांधणारा अजब दुकानदार गणपतशेट वाणी वगैरे आठवणी निघून आमच्या गप्पा गोष्टी चांगल्याच रंगल्या. !

बालकवींचें काव्य म्हणजे मर्ढेकरांचा जीव कीं प्राण ! त्याच बैठकींत बालकवींच्या एक दोन कविता मी त्यांना गाऊन दाखविल्या. बालकवींना ज्या ठिकाणीं आगगाडीचा धक्का लागून अपघाती मृत्यु आला, त्याच ठिकाणीं या बाळ – कवीला अगदीं तसाच अपघात झाला. परंतु आगगाडीनें त्याला ( ' फलाट–दादा 'वर कविता लिहिण्यासाठीं ) वांचविलें. ही अपघाती घटना खुद्द बालकवींच्या ज्येष्ठ भगिनी ती. जिजी यांनीं मला जळगांव मुक्कामीं सांगितली होती. ह्या गोष्टीची आठवण काढतांच बाळासाहेब अत्यंत सद्गदित झाले.

कांहीं दिवसांनीं एक रजिस्टर बुकपोस्ट माझ्या हातीं पडलें. बाळासाहेबांनीं आपला पहिला वहिला कवितासंग्रह (शिशिरागम) सप्रेम भेट म्हणून मला पाठविला होता. मुंबई रेडिओ स्टेशनचे ते ॲसिस्टंट डायरेक्टर असतांना कार्यक्रमाच्या निमित्तानें त्यांच्या व माझ्या वरचेवर भेटी होऊं लागल्या. एकदां त्यांनीं मला खार येथें आपल्या बिऱ्हाडीं नेलें. त्यावेळीं एका पारशी युवतीशीं त्यांचा प्रीतिविवाह झाला होता. त्यांच्या त्या पत्नी सौ. हेमलता घरींच होत्या. त्यांना वहिनी म्हणून घरेलूपणानें संबोधतांच बाळासाहेबांच्या चेहऱ्यावर विशेष टवटवी दिसून आली त्यांच्या हातांतला शिऱ्याचा गंभीर चमचाहि पटकन् त्यांच्या तोंडांत गेला. त्याच वेळीं ' शिशिरागम, ' मधील कवितांवर आम्हीं बोलत होतों.

देत शिशिरागमिं शिऱ्याचीच कोणी
बासि मर्ढेकर ताजि मेजवानी !

अशा काव्यशास्त्रविनोदाचा तो प्रसंग होता. या काळांत मुंबई रेडिओ स्टेशनवर आमच्या पुष्कळच भेटीगांठी झाल्या. ऑफिस सुटल्यानंतर आमच्या बैठकी होत असत त्या आठवणी यथावकाश सांगण्यासारख्या आहेत.

बाळासाहेब मर्ढेकर यांच्या बैठकींत माझ्यामध्यें असलेली एक मोठी उणीव मला वाटत असे. त्यांचा इंग्रजी वाङ्मयाचा गाढ व्यासंग तर त्याबाबतींत मी पूर्ण नि:संग ! त्यांनीं ' मला ' त्यांचा ' Arts and Man ' हा इंग्रजी ग्रंथ सप्रेम भेट म्हणून पाठविला. त्यावेळीं मी मनांतल्यामनांत खूप हंसलों. बाळासाहेब इतके विनोदी असतील याची मला कल्पना नव्हती ! इंग्रजी वाङ्मयप्रकाराबद्दल मी त्यांना वरचेवर कांहीं माहिती विचारीत असे, त्याचा हा परिणाम असावा हें मागाहून माझ्या लक्षांत आलें. या माझ्या उणीवेबद्दल मी एकदां सहज बोललों. त्यावेळीं बाळासाहेब थोर मनानें

मला म्हणाले "अरे, आहे तेंच ठीक आहे, नाहीं-तर तुम्हांला इंग्रजी वाङ्मयांतून बोचकाबोचक करण्याची संवय झाली असती आणि तुमचें वैशिष्ट्य तुम्हीं गमावून बसलां असतां " परवाङ्मयांतील चोरीचा अन् उधारीचा त्यांना किती तिटकारा होता तें यावरून दिसून येतें.

बाळासाहेब मर्ढेकर हे घुम्या वृत्तीचे होते असें बरेचजण सांगतात; परंतु मला मात्र तसा कांहीं अनुभव आला नाहीं. ते मितभाषणी होते एवढेंच ! दर ग्यालनी दहा मैल चालणाऱ्या गाडीला तूं दर ग्यालनीं चाळीस मैल चाललेंच पाहिजेस असा आग्रह आपण तरी कसा धरावा ? ते अहंमन्य होते असेंहि बोलल्याचें कानावर येतें. तसे ते असतील परंतु त्यांत घमेंडीचा भाग नव्हता, " अहम् विशेष: " 'मी कुणीतरी निराळा आहे' असा त्यांचा आत्मविश्वास होता. अंतःकरणांतून उचकी घेत येणारें निरागस हास्य हें घमेंडखोर माणसाचें नसतें. असें त्यांचें हास्य मी पुष्कळवेळां पाहिलें आहे. ते हट्टी आणि थोडेसे तिरसट होते हें मात्र कुणालाहि नाकबूल करतां येणार नाहीं. त्याबद्दल एक प्रसंग आठवला म्हणून सांगतों.

" तुमच्या बऱ्याचशा कविता दुर्बोध आहेत कीं अर्थ खणतां खणतां नाकीं नऊ येतात. काव्याचा आनंद उपभोगण्याऐवजीं जीव कासावीस मात्र होतो, " असें एकदांच मनाचा हिय्या करून मी त्यांना म्हणालों. त्यावर त्यांनीं उत्तर दिलें. " आणखी जास्त खणा म्हणजे सांपडेल !

'ठोठावा म्हणजे उघडेल' असें येशू ख्रिस्ताचें एक वचन आहे. " त्यावर मी थोडें प्रवचन करून म्हटलें " दाराला आंतून भक्कम कडी लावून आणि झोंपेच्या गोळ्या घेऊन गृहामध्यें झोंपलेल्या गृहस्थाप्रमाणें तुमच्या कवितेचा अर्थ असला तर मग ठोठावण्यांत तरी काय अर्थ ? "

" अरे बाबा, नसेल अर्थ तर दे सोडून. " एकेरीवर येऊन ते बोलले. अशा प्रकारें चहा पितां पितां या समरप्रसंगाचा समारोप झाला. — त्यानंतर त्याच्या दुर्बोधतेबद्दल मी त्यांच्याशीं कधींहि बोललों नाहीं.

स्थूलांतील घटकांना सूक्ष्मांतून, अतिसूक्ष्मांतून पाहण्याचें त्यांचें वेड. श्वासांचेदेखील शब्द बनावेत हा त्यांचा छंद.

' किती पायीं लागूं तुझ्या
किती आठवूं गा तूंतें
किती शब्द बनवूं गा
अब्द अब्द मनीं येतें ! '

या त्यांच्या एका सुबोध मनोगताप्रमाणें शब्दां-मध्यें रस, रूप, गंध, स्पर्श आणण्याचा त्यांचा अब्द अब्द प्रयत्न. विचारांना व कल्पनांना आकार देण्याची त्यांची धडपड. या सर्व प्रयोगांमुळें त्यांच्या काव्यांतील आशयाला दुर्बोधता आली असावी.

' आशयाचा तूंच स्वामी
शब्दवाही मी भिकारी
मागण्याला अंत नाहीं
आणि देणारा मुरारी — '

स्वतः बाळासाहेब मर्ढेकरांनीं शब्दांची भीक मागितली आणि मुरारीला आशयाचा स्वामी बन-विलें. त्या मुरारीला " शब्दब्रह्माव्यतिरिक्त ' त्याच्या ' नादब्रह्माचें, एक मागणें मागितलें असतें " तर आशयहि त्यांचे जवळ राहिला असता. आणि माझ्या सारख्या रसिकांनाहि तो कळला असता.

" माझा आत्मा जसा आरसा
पाहो जन त्यामाजि तुला
शब्द अर्थ एकत्र राहुनी
शब्द सेवि अर्थास जसा
असा सदा संयोग असावा
चंद्र–चंद्रिका यांत जसा ! "

बाळासाहेब मर्ढेकरांनीं अनेक प्रयोग केल्यानंतर नवकाव्याच्या निर्मितीमध्यें असा संयोग साधतां












आला असता, परंतु दुर्बोधता ( आणि निर्गेयता ) हेच नवकवितेचे मुख्य गुण समजले जातात त्याला कोण काय करणार ? असो, हा स्वतंत्र विषय आहे. ह्या बाबतींत अधिक विस्तारानें लिहिण्याचें हें स्थान नव्हे. व्यक्ति म्हणून बाळासाहेब मर्ढेकर यांचेशीं मी जितका समरस होऊं शकलों, तितका त्यांच्या काव्याशीं होऊं शकलों नाहीं. त्या बाबतींत माझा प्रामाणिक मतभेद होता व तो प्रमाणाला धरून असा होता. परंतु त्यामुळें आमच्या मैत्रींत कधींच व्यत्यय आला नाहीं. त्यांच्या ज्या कविता मला समजल्या व समजून आवडल्या त्याबद्दल मी मुक्तकंठानें त्यांच्याजवळ स्तुति केली आहे.

दिल्ली येथें १९५४ सालीं मराठी साहित्य संमेलन भरलें होतें त्यावेळीं बाळासाहेब मर्ढेकरांची व माझी बऱ्याच वर्षांनी भेट झाली. मी त्यांच्या घरीं भेटायला गेलों. अंगणांत राघव बाळ खेळत होता, अंगणांतला आनंद घरांत नाचत होता. त्यांच्या द्वितीय पत्नी अंजना मर्ढेकर यांच्यासमवेत पुष्कळ गप्पागोष्टी झाल्या. त्यामात्र हिंदी काव्याबद्दलच्या होत्या. त्याच मुक्कामांत त्यांनीं मला दिल्ली रेडिओ स्टेशनवर दोन कार्यक्रम रेकॉर्ड करण्यासाठीं बोलाविलें. परंतु ऐनवेळीं सरदी-पडशाचा ताप आल्यामुळें ते माझ्या हिंदीकवितांचे कार्यक्रम रेकॉर्ड करण्याचा योग आला नाहीं.

परवांचीच गोष्ट. मार्च महिन्यांत मी इंदोरला असतांना जळगांवहून एक पत्र आलें. तेथील न्यू इंग्लिश स्कूल या संस्थेला चाळीस वर्षें पूर्ण होतात त्या निमित्तानें निघणाऱ्या अंकासाठीं मी संस्थेचा माजी विद्यार्थी म्हणून माझेकडून लेख मागविला होता. दि. २० मार्च रोजीं मी सकाळीं लेख लिहीत बसलों. अकरा साडेअकरा वाजेपर्यंत लेख संपविला. जेवण झाल्यावर सहज दिल्ली नभोवाणी केंद्रावरच्या बातम्या ऐकत बसलों होतों. मर्ढेकरांच्या निधनाची बातमी ऐकतांच मी सुन्न झालों. ज्या वेळीं मी त्या लेखांत बाळ मर्ढेकर याची एक आठवण लिहीत होतों, त्याच वेळीं दिल्लीला तो शेवटचे क्षण मोजीत होता. आपल्या शेवटल्या श्वासाचा शब्द बनविण्यासाठीं माझा बालमित्र देवाघरीं निघून गेला. दोनतीन दिवस मी बेचैन होतों. प्रा. श्री. पु. भागवत यांना एक पत्र पाठवून मी माझें दुःख हलकें केलें.

मर्ढेकरांच्या काव्यगुणांचें मोजमाप करणारा काळ आहे. त्या बाबतींत येथें लिहीत नाहीं. मर्ढेकरांचे चाहते त्यांना दुसरे केशवसुत म्हणून गौरव करतात. मला तसें म्हणावेसें वाटत नाहीं. दुसरा शिवाजी अन् दुसरा बाजीराव ! एक वेडगळ तर दुसरा पळपुटा ! नांवाच्या बाबतींत हें असें होऊन बसलें आहे ! ही झाली केवळ नांवाची गोष्ट. परंतु कृतीवरूनहि कुणाशीं कुणाची तुलना करूं नये. प्रत्येकांत स्वतःचें असें कांहींतरी स्वतंत्र वैशिष्ट्य असतें. बाळासाहेब मर्ढेकर हे दुसरे केशवसुत नव्हते किंवा दुसरे बालकवि नव्हते. ते पहिले मर्ढेकर आहेत.

---








प्रा. म. वा. वेलगे

# ग्रामविकास व भारतीय स्टेट बँक

" All India Rural Credit Survey " हा अहवाल केन्द्रीय बँकेनें सादर केल्यापासून ग्रामीण जीवनांच्या प्रश्नांकडे अनेक विचारवंतांचें लक्ष वेधलें आहे. भारत हा देश कृषिप्रधान असल्यामुळें शेतकऱ्यांना स्वस्त व सुलभ पत लाभावी म्हणून अनेक अहवाल, प्रबंध व प्रतिवृत्तें प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्या दृष्टीनें १९३७ सालापासून ते १९५२ व ५४–या सालापर्यंत अनेक रिपोर्ट या ना त्या स्वरूपांत प्रसिद्धि पावले. पण ग्रामीण जीवनांसाठीं जी पत ( credit ) लागते त्या दृष्टिकोणांतून प्रत्यक्षांत उतरणारा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. म्हणून १९५४ सालीं जेव्हां वरील अहवालानें ग्राम-विभागांत बँकाचें जाळें पसरावें अशी सूचना केली त्या बरहुकूम इंपीरियल बँकेचें रूपांतर स्टेट बँकेंत करण्यांत आलें. हीच बँक केवळ खेड्यापर्यंत जाण्याच्या परिस्थितींत होती. कारण या बँकेच्या शाखा देशाच्या सर्वच भागामध्यें पसरलेल्या होत्या. म्हणून इंपीरियल बँकेचें १ जुलै १९५५ ला स्टेट बँकेंत रूपांतर करण्यांत आलें.

वरील अहवालांत ज्या प्रकारची शिफारस करण्यांत आली ती अशीः– " One strong integrated state.–partnered commercial banking institution with an effective machinery of branches spread over the whole country for stimulating banking development by providing vastly extended remittance-facilities for co-operatives and other banks and following a policy which would be in effective consonance with national policies adopted by the Government without departing from the canons of sound business. " अशा रीतीनें आपल्या अनेक शाखाद्वारें सहकारी संस्थांना पैसे व निधि खेड्यापर्यंत उपलब्ध करून देण्याचें कार्य स्टेटबँकेचें राहील व त्याचबरोबर असें राष्ट्रीय कार्य करीत असतांना आर्थिक व व्यवहारी तत्त्वांचा उपयोग केला जाईल.

यापूर्वी आपल्या देशाची रिझर्व बँक ॲग्रिकल्चर-कोऑपरेटिव्ह क्रेडिट डिपार्टमेंट द्वारें प्रांतीय सहकारी बँकांना पत प्राप्त करून देत असे. तेथून ते निधि जिल्ह्यांतील केन्द्रीय सहकारी अधिकोषास मिळून मग ते तालुक्यांतील युनियन्स किंवा प्राथमिक सहकारी संस्थांना मिळत असत; व नंतर त्याचा उपयोग शेतकरी घेत असे. पण आतां बँकेच्या शाखा सबंध हिंदुस्थानांतील महत्त्वाच्या शहरीं असल्यामुळें त्या शाखांच्या उपशाखाद्वारें हे निधि खेड्यापर्यंत पोंहोचविण्याचें कार्य ट्रेझरी व सबट्रेझरीमार्फत करण्यांत येईल.

यावरून हें कार्य किती विशाल आहे याची कल्पना येईल. एवढेंच कार्य स्टेट बँक करील असें नाहीं तर या नवीन बँकेपासून अनेक कार्यें कार्यक्षमतेनें घडवून आणण्याच्या योजनाहि आहेत त्या अशा :–

( १ ) स्टेट बँक ही आपले पूर्वीचें वाणिज्य व व्यापारी कार्य तसेंच चालू ठेवील. ( २ ) शेतकरी संघांत ग्रामीण विभागांत स्वस्त पत उपलब्ध करून देईल. ( ३ ) ग्रामीण विभागांतील लहानसहान ग्रामोद्योगांना आर्थिक सहाय्य करील. ( ४ ) हीं सर्व कार्यें करीत असतांना सहकारी चळवळीला उत्तेजन व चालना देईल.

वरील कार्यावरून बँकेच्या कार्याचें क्षेत्र व पसारा केवढा विस्तृत आहे याची कल्पना येते. खेड्यांत उत्पन्न होणारा शेतीचा माल तयार झाल्यापासून तो शहरांमध्ये पाठविणें इ० कार्यासाठीं लागणारी आर्थिक कृति व कार्य यांना अर्थसाहाय्य करण्याचा जणूं कांहीं या बँकेनें विडाच उचललेला आहे !

### कार्याची व्यापकता

एवढें विशाल व विविध कार्यें नाणेबाजारांतील ही








बँक कितपत करूं शकेल या बाबतींत अनेक मतमतांतरें आहेत. शिवाय नाणेबाजारांतील अनेक संस्थांना शह देऊन ग्रामीण लोकांना पत मिळवून देण्यांसाठीं अशाच सोयीस्कर बँकेची आवश्यकता होती हें जाणलें तरी ही बँक आपल्या सेवेनें प्रत्यक्ष किती लोकांना पत ( credit ) प्राप्त करवून देऊं शकेल याबद्दल दाट शंका वाटते. कारण भारताच्या नाणेबाजारांत अजूनहि सावकार व महाजन या लोकांची जबरदस्त पकड आहे, हें खालील आंकडेवारीवरून दिसून येईल.

| पत credit देणाऱ्या संस्था | पत-प्राप्तीचें प्रमाण |
|---|---|
| ( १ ) सरकार | ३·३% |
| ( २ ) सहकारी संस्था | ३·१% |
| ( ३ ) शेतीस पत पुरविणारे सावकार | २४·९% |
| ( ४ ) व्यापारी महाजन | ४४·८% |
| ( ५ ) व्यापारी बँका | ·९% |
| ( ६ ) नातलगाकडून | १४·२% |
| ( ७ ) जमीनदार | १·५% |
| ( ८ ) इतर संस्था | ७·३% |

याचा अर्थ असा कीं स्टेट बँकेनें नाणेबाजारांतील सावकार व महाजन यांच्यापेक्षांहि पुढें गेलें पाहिजे. ग्रामीण जनतेस पत पुरविण्यावरच तिचें यश अवलंबून राहील. कारण शेंकडा ७० प्रमाणांत पत मिळवून देणाऱ्या एकमेव संस्था महाजनांच्याच आहेत. यासाठीं व्याजाचा दरसुद्धां कमी असावयास हवा. पत-प्राप्ति होणें हें केवळ ध्येय असूं नये तर शेतकऱ्यांना ती पत कमी दरानें उपलब्ध व्हावयास पाहिजे. आपल्या देशांतील व्याजाचा दर पाहिल्यास शेतकऱ्यांना अशा महाग पत-प्राप्तीपासून काय लाभ होत असेल याचें आश्चर्यच वाटतें. मुंबईप्रांतांत व्याजाचा दर शेंकडा १२, मध्यप्रदेशांत तो शेंकडा १८, तर उत्तरप्रदेशांत तो शेंकडा २४ असा विभिन्न स्थळीं वेगवेगळा आढळतो. असा हा महत्त्वपूर्ण आर्थिक प्रश्न सोडविण्याकरितां राज्याचा वरदहस्त असणारी संस्था असावी हें एकपरी योग्यच आहे. पण बँक वरील कार्यें पार पाडील काय हा प्रश्न सारखा राहतोच !

**स्टेटबँकेच्या कार्यांचें स्वरूप –**

स्टेटबँकेच्या कार्यांकडे पाहिल्यास तीं प्रमुख दोन विभागांत वाटलीं जातात ( १ ) व्यापारी कार्यें ( २ ) शेतकी कार्यें. –हीं दोन्ही कार्यें विशाल आहेत, व प्रत्येक कार्याचें राष्ट्राच्या आर्थिक क्षेत्रांत स्वतंत्र स्थान आहे. स्टेटबँक रोजच्या व्यवहाराचीं व्यापारी कार्यें करून शेतकी कार्यें कशी करील; व केल्यास त्यापासून उद्देशानुसार हित होईल किंवा नाहीं याबद्दल शंका वाटते. परदेशांमध्यें व्यापार व शेती ही दोन्हीं क्षेत्रें विभिन्न मानलीं जातात. युरोपांतील बँकिंगची व्यवस्था पाहण्यास शेतीकरितां वेगळया बँका तेथें आहेत. वाणिज्य –व्यवहार करणाऱ्या बँका शेतीचें कार्य करीत नाहींत. अमेरिकेंत फेडरल फार्म बोर्डाच्या आधिपत्याखालील शेतीच्या कामाकरितां अर्थसाहाय्य करणाऱ्या संस्था आहेत. भारतासारख्या अर्धविकसित राष्ट्रामध्यें बँकेच्या तांत्रिक शिक्षणाच्या व पुऱ्या अनुभवाच्या अभावीं हीं दोन्हीहि कार्यें किती कार्यक्षमतेनें पार पडतील हें आजतरी निश्चित सांगतां येत नाहीं.

याशिवाय स्टेट बँकेला मोठ्या प्रमाणावर आपल्या भांडवलाची गुंतवणूक करावी लागेल; व ही गुंतवणूक शेतीला साहाय्य करणाऱ्या पतपेढ्यांत करावी लागेल. एवढ्या मोठ्या भांडवलाची अर्थ-व्यवस्था बँक सांभाळील असें धरून चाललें तरी ज्या सहकारी चळवळीची जिम्मेदारी या बँकेवर टाकली आहे ती पार पडणें कठीण दिसतें. या बँकेची ग्रामीण विभागाच्या उन्नतीकरितां करावयाचीं कार्यें सहकारी स्वरूपाचीं राहतील व त्या दृष्टीनें सहकारी चळवळीच्या यशापयशावर बँकेचेंहि यशापयश अवलंबून राहील. अहवालांत निर्देश केल्यानुसार " the movement must be so improved as to derive utmost benefits from the bank services. " त्या दृष्टीनें भारताच्या सहकारी चळवळीकडे पाहिल्यास ती आजतागायत अपयशीच ठरली आहे. त्याचीं अनेक कारणें आहेत पण प्रस्तुत तो आपला विषय नसल्यामुळें त्याची कारणमीमांसा करणें विषयाच्या बाहेरचें आहे. प्रश्न हा आहे कीं इतकीं वर्षें सहकारी चळवळ चालूनहि फक्त सहकारी पत-पेढ्याच्या क्षेत्रांतच आपली काय ती प्रगति झालेली आहे. पत-पेढ्या ( credit – societies ) वर अधिक जोर दिल्यामुळें सहकाराचीं इतर दालनें केवळ नाममात्रच झालीं.

याशिवाय ग्रामीण विभागांत परवाना असलेलीं भांडारें ( licensed ware - houses ) काढ-









अनुक्रमणिका

ण्याचें कार्य स्टेट बँकेच्या नेतृत्वाखालीं येणार आहे. त्या भाण्डारांत शेतकरी आपलें धान्य सांठवतील किंवा त्या भाण्डारास ते आपला शेतीचा माल विकतील व त्यांच्या सहकार्यानुसार ही नवीन संस्था कार्य करील. कार्यें करण्यास अनेक शाखा स्टेट बँकेला काढाव्या लागतील. १९५१ मध्यें इंपीरियल बँकेच्या रिझर्व बँकेशीं झालेल्या करारानुसार १४४ नवीन शाखा काढण्याचें निश्चित झालें होतें. १ जुलै १९५५ मध्यें तिचें परिवर्तन स्टेट बँकेत केलें त्यावेळीं जवळ जवळ ८३ शाखा स्थापन करण्यांत आल्या. नव्यानेंच १०० शाखा काढण्याची योजना घोषित केली गेली. पण त्या नवीन शाखा कुठें काढणार हें अनिश्चितच राहिलें आहे.

वरील सर्व अडचणींशिवाय सर्वांत मोटी अडचण लोकांना अधिक विश्वास वाटून त्यांचा उत्साह कसा वाढेल ही आहे. खाजगी क्षेत्रांतील ही बँक आता सरकार जमा झाल्यामुळें खाजगी लोकांना या बँकेच्या व्यवहारांवर पाहिजे तेवढा विश्वास राहिला नाहीं. खाजगी भागीदार तर बँकेवर नाखूषच आहेत पण या बँकेंत निधि ठेवणाऱ्यांच्या मनांतहि अस्थिरतेची भावना उमटलेली दिसून येते. जर या बँकेच्या डिसेंबर १९५४ ते डिसें० १९५५ पर्यंतच्या निधींचें (deposits) परीक्षण केलें तर ५ कोट रुपयांची त्यामध्यें घट झालेली दिसून येते. उलट, अनुसूचित बँकेच्या निधींत त्याच काळांत ९४२ कोटी रुपयांपासून १०३३ कोटींपर्यंत वाढ झालेली दिसून येते. ! अर्थात् याला सर्वस्वी ही नवीन बँकच जबाबदार असें नसून सरकारची आर्थिक नीतिसुद्धां कारणीभूत आहे. 'समाजाची समाजवादी घडण' निर्माण करण्याचें ध्येय सरकारचें असल्यामुळें खाजगी क्षेत्रांतील व्यापारी लोकांच्या व उद्योगपतींच्या मनामध्यें राष्ट्रीयीकरण झालेल्या संस्थेविषयीं एक प्रकारची शंका निर्माण झाली आहे. निधीच्या घटीचें कारण हें सुद्धां असूं शकेल.

सरकारनें या बँकेवर अनेक जबाबदाऱ्या एकाच वेळीं टाकल्या आहेत. शेतकीला द्रव्य साहाय्य देणें, आपलीं नित्याचीं वाणिज्यकार्यें पार पाडणें, सहकारी चळवळीस उत्तेजन देणें, उद्योगधंद्यास आर्थिक मदत पुरविणें, रिझर्व बँकेचे एजन्ट म्हणून कार्य करणें व हीं कार्यें करीत असतां तीं सरकारच्या आर्थिक धोरणाशीं सुसंगतरीत्या करणें इत्यादि गोष्टी सोप्या नाहींत. आपणांस जो नोकरवर्ग प्राप्त झालेला आहे त्यांच्या वृत्तींत फार मोठें परिवर्तन होणें अत्यावश्यक आहे. त्यांचा संबंध आतां ग्रामीण जनतेशीं येणार आहे. त्यामुळें ग्रामीण जनतेची सेवा करून सहानुभूति प्राप्त होऊं शकली तरच स्टेट बँक ही जनतेला आपली बँक वाटेल. नाहींतर तिचें स्वरूप केवळ सरकारीच राहील. म्हणून अहवालांतील शब्दांतच सांगावयाचें झाल्यास " ग्रामीण जनतेचा प्रश्न हा केवळ त्यांना पत (credit) पुरविण्याचा नसून खेड्यांतील जनतेच्या सामाजिक व आर्थिक जीवनाच्या पुनर्घटनेचा तो आहे. म्हणून त्याची फारकत सामाजिक व आर्थिक जीवनापासून करतां येणार नाहीं. (" The problem of rural credit becomes inseparable from that of the reorganization of the socio-economic structure of the Indian village itself. ") एवढ्या मोठ्या दिव्यांतून स्टेट बँक कशी यशस्वीरीतीनें बाहेर पडते याकडेच सर्वांचें लक्ष लागणें साहजिक आहे.

---

## दयाचक्षु उन्मीलित करणारा बुद्ध

आपल्या मानवाच्या अंगीं सर्वांत श्रेष्ठ चक्षु जो दया-चक्षु तो उन्मीलित करण्याचा बुद्धानें प्रयत्न केला. जी गोष्ट आपल्या चर्मचक्षूंना दिसत नाहीं पण जी या दया-चक्षूला दिसते ती म्हणजे जीवमात्राची एकता. 'मी', 'तूं' आणि 'तो' या तिघांनाहि पृथक् अस्तित्व आहे. पण उपनिषदीय ऋषी, भगवान् कृष्ण आणि महात्मा बुद्ध यांनीं अशी शिकवण दिली कीं, जर आपलें अंतःकरण दयार्द्र झालें तर हें पृथक् अस्तित्व मिटून, मी स्वतः दुसऱ्यांच्या ठिकाणीं आणि दुसरे माझ्या ठिकाणीं दिसूं लागतात. हृदय दयाशून्य व कठोर झालें कीं आपण आंधळ्यासारखे होतों. दयेच्या अंतर्भेदी व्यापक पूर्णदृष्टीमुळें, मायेचें आवरण दूर होऊन विश्व व आत्मा यांचें ऐक्य घडून येतें.

— चक्रवर्ती राजगोपालाचार्य

('जीवनसाहित्या'च्या 'बुद्धजयन्ती' अंकांतून)








प्रा. गं. बा. सरदार

# संकल्पित महाराष्ट्रांतील समाजसुधारणेची दिशा

संयुक्त महाराष्ट्र आतां लवकरच अस्तित्वांत येणार आहे. तेव्हां या नव्या प्रदेशराज्याची पुनर्घटना म्हणजेच त्याच्या आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक इत्यादि अनेकविध अंगांची पुनर्घटना कोणत्या दिशेनें व्हावी याबद्दल साधक बाधक चर्चा होणें क्रमप्राप्त आहे. आजच्या प्रसंगीं संकल्पित महाराष्ट्रांतील समाजसुधारणेच्या चळवळीबाबत यापुढें आपण कोणता सर्वंकष दृष्टिकोन स्वीकारण्याची आवश्यकता आहे या विषयावर केवळ तात्त्विक भूमिकेवरून प्रकट चिंतन करण्याचें मी योजिलें आहे.

संपूर्ण समाजजीवन हें प्रवाही व एकात्म असून त्याचीं वेगवेगळीं अंगें हीं परस्परावलंबी असतात. म्हणून समाजाच्या स्थितिगतीचा विचार करावयाचा, तर ह्या विविध अंगांच्या परस्परसंबंधाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. विवेचनाच्या सोयीसाठीं त्यांचें वर्गीकरण करावेंच लागतें. परंतु त्यांतील एखादें अंग – मग तें आर्थिक असो वा सांस्कृतिक असो–इतर अंगांपासून विलग करून त्याची स्वतंत्रपणें चिकित्सा करतां येणार नाहीं, त्यावर खास असा तोडगा सांगतां येणार नाहीं. देशाची आर्थिक प्रगति, राजकीय पुढाऱ्यांची दानत व ध्येयनिष्ठा, बहुजनसमाजांतील शिक्षणप्रसार यांवर सामाजिक सुधारणांचें भवितव्य पुष्कळच अवलंबून आहे. म्हणून समाजकारणाचा विचार करतांना, राजकारण, अर्थकारण इत्यादि अंगांचेंहि अनुसंधान राखणें अगत्याचें आहे.

## प्रादेशिक अहंता व राष्ट्रीय ऐक्य

एकभाषिक महाराष्ट्रापुढील प्रश्नांचा विचार करतांना प्रथम एका वादग्रस्त मुद्द्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. अलीकडे असा एक आक्षेप वारंवार ऐकूं येतो कीं, भाषिक राज्यांचें भलतेंच स्तोम माजविलें जात असून ही प्रादेशिक अहंता अखेर राष्ट्रीय ऐक्याला बाधक ठरल्याखेरीज राहणार नाहीं. पूर्वग्रह बाजूला सारून जरा खोल विचार केला कीं, या आक्षेपांत कांहीं तथ्य नाहीं हें सहज दिसून येईल. अखिल भारतीय संस्कृति व निरनिराळ्या प्रादेशिक संस्कृती यांच्यामध्यें जसें समानधर्मित्व आहे, तसें प्रत्येक प्रादेशिक संस्कृतीचें म्हणून कांहीं खास वैशिष्ट्यहि आहे. भारतीय व प्रादेशिक संस्कृतींचा संबंध हा एक वृक्ष व त्याच्या अनेक शाखा अशा तऱ्हेचा नाहीं. सागराला ज्याप्रमाणें सर्व जलप्रवाह येऊन मिळावेत, त्याप्रमाणें भारतीय संस्कृतींत विविध प्रादेशिक संस्कृतींचा मिलाफ झालेला आहे म्हणून भारतीय संस्कृतीचें स्वरूप ' सूत्रे मणिगणा इव ' यासारखें समुच्चयात्मक व बहुरंगी आहे. तसें पाहिलें तर, नवनिर्मितीचें सामर्थ्य प्रादेशिक संस्कृतींतच जास्त आहे. जीवनसत्यांचा शोध घेऊन व आपापल्या परीनें त्यांचा आविष्कार करून प्रत्येक प्रादेशिक संस्कृतीनें भारतीय संस्कृतीला खंडणी दिलेली आहे. या विविध आविष्कारांत एकसूत्रीपणा आणण्याचें महनीय कार्य भारतीय संस्कृतीनें साधलें आहे. वेदांताच्या परिभाषेंत सांगावयाचें झालें, तर भारतीय संस्कृतीच्या विशाल स्वरूपांत अद्वैत आहे, पण तें केवलाद्वैत नसून विशिष्टाद्वैत आहे; म्हणूनच प्रादेशिक संस्कृतींच्या उत्कर्षांत व समृद्धींत भारतीय संस्कृतीची संपन्नता आणि ऐश्वर्य आहे.

दुसऱ्याहि एका दृष्टीनें प्रादेशिक अहंता राष्ट्रहिताला उपकारक ठरण्याचा संभव आहे. भारतीय संघराज्यांतील इतर प्रदेशांप्रमाणें महाराष्ट्रांतहि जातिभेद, पंथभेद, पक्षभेद, उपप्रदेशाचा अवास्तव अभिमान इत्यादि फुटीर प्रवृत्ती बळावत आहेत अशावेळीं भारतीय ऐक्याला व लोकशाहीला बाध न येतां सबंध महाराष्ट्र जर एकभाषिकत्वाच्या खऱ्याखुऱ्या स्नेहरज्जूनें एकत्र बांधला गेला, तर वरील

गेल्या मे महिन्यांत पुणें येथील वसंतव्याख्यानमालेंत प्रा. गं. बा. सरदार यांचें वरील विषयांवर व्याख्यान झालें. त्यांतील तत्त्वविवेचन येथें सारांशरूपानें दिलें आहे.—का. सं.








संकुचित व फुटीर प्रवृत्ती मोठ्या प्रादेशिक अहंतेंत लुप्त होतील. याप्रमाणेंच इतर प्रांतांतहि घडून आल्यास संघराज्याचा प्रत्येक घटक एकजिनसी व सुदृढ बनून भारतीय लोकशाही अधिक पायाशुद्ध व प्रभावी होईल. भाषा व प्रदेश याबद्दलची निकोप अहंता आजच्या युगधर्माशीं खचित सुसंगत ठरेल. मात्र त्यासाठीं भारतीय ऐक्यावरील निष्ठा यत्किंचितहि ढळूं न देण्याची सतत खबरदारी घेतली पाहिजे. प्रादेशिक असो वा राष्ट्रीय असो, कोणत्याहि अहंतेंत विवेकबुद्धि आणि तारतम्य शाबूत राखण्याची गरज आहेच आहे.

## सुधारणावादाची परंपरा

महाराष्ट्रांतील सुधारणावादाची परंपरा पाहातां गेल्या सुमारें सव्वाशें वर्षांचा इतिहास डोळ्यासमोर उभा रहातो; आणि कांहीं ठळक प्रवृत्ती चटकन् लक्षांत येतात. या प्रवृत्तींच्या अनुरोधानें वरील इतिहासाचे स्थूलमानानें तीन कालखंड पडतात. पहिला कालखंड १८१८–१८८० हा होय. डॉ. आंबेडकर यांनीं म्हटल्याप्रमाणें या कालखंडांतील समाजसुधारणा ही खरोखर कुटुंबसुधारणाच होती. ब्रिटिशांची राज्यपद्धति, व्यापार, आणि पाश्चात्त्य विचारप्रवाह यांच्या आघाता-मुळें दैनंदिन जीवनांत ज्या अडचणी निर्माण होत होत्या, त्यातून कसाबसा मार्ग काढणें एवढीच पहिल्या पिढी-तील सुधारकांची दृष्टि होती. स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, पुनर्विवाह या प्रश्नांचा मूलगामी विचार करण्याची त्यांना गरज भासली नाहीं. जुनें शास्त्र आणि नवा व्यवहार यांचा ओढून ताणून मेळ घालण्याचीच त्यांनीं शिकस्त केली. त्यामुळें समाजजीवन तळापासून ढवळून निघेल अशी प्रेरणा व शक्ति या सामाजिक चळवळींना कधींच लाभली नाहीं. ह्या काल-खंडाचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे समाजसुधारकांनीं एकतर राजकारण अजिबात वर्ज्य तरी मानलें, किंवा त्याबाबतींत अगदीं नेमस्तपणाचें धोरण स्वीकारलें. भारताचा ब्रिटनशीं आलेला संबंध हा दैवी योगायोग आहे; ईश्वरी अनुग्रह आहे; तेव्हां इंग्रजांच्या हाता-खालीं दीर्घकाळ उमेदवारी करून आपल्या समाजांत ज्ञानप्रसार, विचार–परिवर्तन व नैतिक सुधारणा घड-वून आणल्याखेरीज आपणांस तरणोपाय नाहीं अशी त्यांची प्रामाणिक समजूत होती.

त्यानंतरच्या दुसऱ्या कालखंडांत (१८८०–१९२०) टिळकांचा राजकीय जहाल पक्ष लोकप्रिय झाला; आणि राजकारणाला ऊर्जितावस्था आली. ब्रिटिश राज्यकर्त्यांविरुद्ध एकजुटीनें उभें रहावयाचें, तर ज्यामुळें लोकांचा बुद्धिभेद होईल, व आपसांत फूट पडून स्वराज्याची चळवळ कमजोर होईल अशा अंतर्गत सामाजिक प्रश्नांवर तूर्त भर देऊं नये अशी विचारसरणि रूढ झाली. "आधीं सामाजिक का आधीं राजकीय" या वादांत राजकीय पक्ष विजयी झाला; आणि समाजसुधारणेचा प्रश्न गौण व उपेक्ष-णीय ठरला.

तिसऱ्या कालखंडांत म्हणजे गांधीयुगांत (१९२०–१९४७) राजकारण व समाजकारण यांतील विरोध संपला तरी सामाजिक चळवळी नेहमी राजकारणाच्या अंकित राहिल्या. सामुदायिक चळवळी उभारावयाच्या, तर त्यांना सर्व थरांतील लोकांनीं पाठिंबा दिला पाहिजे. कायदेमंडळांतून परकीय सत्तेला शह द्याव-याचा, तर बहुजन समाजाचीं मतें मिळविलीं पाहि-जेत. या दृष्टीनें दलितोद्धार, अस्पृश्यतानिवारण, ग्रामोद्योग इत्यादि सामाजिक प्रश्न राजकीय कार्य-कर्त्यांना हातीं घ्यावे लागले. समाजसुधारणेकडे राज-कीय सत्तासंपादनाचें एक साधन म्हणून पाहिलें गेल्या-मुळें राजकारणाच्या सोयीसाठीं विधायक कार्यकर्त्यांना बरींच पथ्यें सांभाळावीं लागलीं. कारण, परतंत्र देशांत राजकारणाला युगधर्माचें, अंतिम साध्याचें स्वरूप प्राप्त होतें. सबंध समाजजीवनावर साहाजिकच राज-कारणाचा जबर पगडा बसतो.

स्वातंत्र्योत्तर कालांत तरी समाजसुधारणेच्या प्रश्नांना खरोखर महत्त्व यावयास हवें होतें. पण दुर्दैवानें तसें झालें नाहीं. "राजकीय स्वातंत्र्य मिळालें, तरी आर्थिक पुनर्घटनेची विराट् समस्या सध्यां आपल्या-समोर आहे; राष्ट्रीय जीवनांत तिला अग्रस्थान दिलें पाहिजे; सामाजिक संघर्षांत विनाकारण आपल्या शक्ती-चा अपव्यय होऊं देतां कामा नये" अशासारखे युक्तिवाद वारंवार पुढें मांडले जातात. पण यांमागें तात्कालिक व निकडीच्या प्रश्नांची सबब पुढें करून अंतिम साध्याला गौण लेखण्याची प्रवृत्ति दिसून येते. सामा-जिक सुधारणा हा समाजाचा जिव्हाळ्याचा मूलगामी प्रश्न आहे. तात्कालिक प्रश्न व अडचणी कधींच संप-








णार नाहींत. त्यांचें बुजगावणें उभें करून सामाजिक सुधारणांची उपेक्षा करणें असमंजसपणाचें होईल.

## विचारक्रांतीची आवश्यकता

लोकशाही व समाजवाद हीं ध्येयें भारतांतील बहुतेक सर्व राजकीय पक्षांनी स्वीकारलीं आहेत. पण या ध्येयांकडे वाटचाल करण्याच्या दृष्टीनें पद्धतशीर व सुसंघटितपणें प्रयत्न होत आहेत का ? आपली मनोभूमिका, आपल्या सामाजिक संस्था, आपलीं जीवनमूल्यें या ध्येयांशीं सुसंगत आहेत का ? महाराष्ट्रांतील शेंकडा नव्वद टक्के समाज जीर्ण परंपरेशीं इतका जखडलेला आहे, इतका जडमूढ व गतानुगतिक आहे कीं, लोकशाही आणि समाजवाद यांच्या प्रभावाची व श्रेष्ठतेची त्याला अगदीं कल्पना आणून देणें देखील दूरापास्त आहे. आधुनिक विज्ञानानें उपलब्ध करून दिलेली अद्ययावत् यंत्रसामग्री व तज्जन्य सुखसोयी यांचा आम्ही प्रत्यहीं उपयोग करीत असलों, तरी आमचीं मनें, आमचें अंतर्जीवन मध्ययुगीन कल्पनाकोशांतच घुटमळत आहे. बाह्य जीवनांत आपण ठिकठिकाणीं विजेचा वापर करतों; पण आपल्या जाणिवा अद्याप बैलगाडीच्या युगांत रेंगाळत आहेत. मोठमोठ्या शहरांतील कांहीं मूठभर लोक वगळले तर बाकी सर्वांच्या विचारसरणीवर मध्ययुगीन मूल्यांची पकड कायम आहे. त्यामुळें आपल्या सामाजिक संस्था निःसत्त्व व प्रेरणाशून्य बनून राहिल्या, तर नवल नाहीं. म्हणून आज खरी निकडीची गोष्ट जर कोणती असेल, तर बहुजनसमाजाच्या विचारांत व मनोवृत्तींत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणणें ही होय. आमूलाग्र परिवर्तन म्हणजे झटपट बदल नव्हे हें जरी खरें असलें, तरी आपलें अंतिम ध्येय कोणतें याबद्दल आपल्या मनांत संदेह असतां कामा नये. समाजसुधारणेचें वैचारिक अधिष्ठान सुस्पष्ट, ठाम व खंबीर असलें पाहिजे. आगरकरांनीं म्हटल्याप्रमाणें क्षुल्लक सुधारणा असली, तरी ती जाणीवपूर्वक, बुद्धिपुरःसर घडवून आणली पाहिजे. सुधारणेच्या तपशिलापेक्षां, दृष्टिकोनांतील बदल जास्त महत्त्वाचा आहे. त्यासाठीं रूढिप्रामाण्याच्या, बौद्धिक गुलामगिरीच्या मुळावरच घाव घातले पाहिजेत. ज्ञानेश्वरांचा एक दृष्टांत येथें तंतोतंत लागू पडतो.

' जैसी वरिवरि पालवी खुडिजे ।
आणि मूळीं उदक घालिजे ।
तरि कैसेनि नाशु निफजे ।
वृक्षा तेया ॥ '

सामाजिक पुनर्घटनेच्या कार्यांत आपल्यापुढील अंतिम ध्येय व टप्याटप्यावरील तात्कालिक उद्दिष्टें यांचा व्यवस्थित मेळ बसला पाहिजे. केवळ तात्कालिकावर भर देणारे संधिसाधु बनतात. उलट पक्षीं, वस्तुस्थितीकडे डोळे झांक करून अंतिम साध्याचा ध्यास घेणारे अखेर स्वप्नाळू ठरतात. व्यवहारांत तडजोड अटळ असली, तरी तत्त्वचर्चेत समन्वयाचा मोह आवरला पाहिजे. व्यवहारचातुर्यानें तत्त्वनिष्ठेवर मात केल्यास कांहीं मामुली सुधारणा हस्तगत होतील; पण सामाजिक पुनर्घटनेच्या दृष्टीनें अनेक लढाया जिंकूनहि युध्द हरल्यासारखें होईल.

आज आपल्यांतील बऱ्याच सुशिक्षितांच्या मनावर पुन्हां पुनरुज्जीवनवादाचा पगडा बसत असलेला दिसून येतो. दोन महायुद्धांमुळें युरोपीय संस्कृतीची भयंकर वाताहत झालेली आहे. कित्येक पाश्चात्य तत्त्वचिंतकांना वैफल्यानें ग्रासलें आहे. हें दृश्य पाहून आमच्यांतील कांहीं विचारवंत आधुनिक विज्ञान व बुद्धिवाद याविषयींच साशंक झाले असून त्या भांबावलेल्या मनःस्थितींत प्राचीन भारतीय संस्कृतीकडे आशाळभूतपणानें पाहात आहेत. " चारशें वर्षांची आधुनिक युरोपीय संस्कृति कोलमडत आहे; उलट आमची चारहजार वर्षांची भारतीय संस्कृति बघा कशी अजून टिकून राहिली आहे ." अशा स्वयंसंतुष्टतेनें ते पुराणमतवादाला नवा पेहराव चढविण्यांत दंग झाले आहेत. अद्ययावत् युक्तिवादाच्या आधारानें कोणत्याहि प्रश्नाची सूक्ष्म-अतिसूक्ष्म छाननी करणाऱ्या या चिकित्सक विचारवंतांना आधुनिक विज्ञानाचें व विचारप्रणालींचें मर्म कळत नाहीं असें कसें म्हणतां येईल ? पण ते तर कळत न कळत आपल्या विद्वत्तेचा विनियोग पुनरुज्जीवनवादावर बुद्धिनिष्ठेचा साज चढविण्यासाठीं करीत असलेले दिसतात. आजच्या जीवनांत स्थैर्य व सुरक्षितता यांची वाण आहे. जीवनाची गतिमत्ता व व्यक्तीची असहायता यांची उद्वेगजनक युति पाहून मानवजातीच्या भवितव्याबद्दल चिंता वाटणें स्वाभाविक आहे. पण त्यासाठीं पुन्हां मागें फिरून पुराणमतवादाचें मंडन करण्यांत हंशील नाहीं. त्यामुळें युगानुयुगें अज्ञानांत खितपत पडलेल्या जनतेच्या अंधश्रद्धेला

व रूढिप्रियतेला खतपाणी मिळतें; आणि भविष्याबद्दल आधींच साशंक असलेल्या सुशिक्षितांच्या मनांत वैचारिक गोंधळ निर्माण होतो.

## समाजकारण आणि राजकारण

' सामाजिक चळवळ यशस्वी व्हावयाची, तर तिला राजकारणाचा संपर्क लागूं देतां कामा नये. राजकारण म्हणजे सत्तालोभ, पक्षाभिनिवेश, असहिष्णुता. या सत्तास्पर्धेपासून अलिप्त राहून उदार व सहिष्णु वृत्तीनें कार्य करणाऱ्या व्यक्ती व संस्थाच समाजसुधारणेची जबाबदारी नीट पार पाडूं शकतील ' – अशा प्रकारची विचारसरणि पुढें येऊं पाहात आहे. परंतु सध्यांची एकंदर परिस्थिति लक्षांत घेतां या विचारसरणीनें कोणताच कार्यभाग साधणार नाहीं असें वाटतें. आज मनुष्य कितीहि सुधारलेला दिसला, तरी त्याच्यांतील पशुवृत्ति साफ नाहींशी झालेली नाहीं. त्याच्या मनोवृत्ती क्षुब्ध झाल्या, त्याच्या हितसंबंधांना धक्का बसला कीं त्याचा तोल सुटतो व आपल्या पशुवृत्तीला तो काबूंत ठेवूं शकत नाहीं. अशा अविवेकी मनुष्याचा समाजाला उपद्रव होऊं नये म्हणून दंडसत्तेची आवश्यकता आहे. मनुष्याच्या आचारविचारांत स्वार्थबुद्धि आणि सद्भावना या दोहींचाहि प्रभाव दिसून येतो. म्हणून त्याच्या सुधारणेसाठीं शासन व शिक्षण, नियंत्रण व संस्करण अशा दुहेरी प्रयत्नांची जरूरी आहे. शिवाय आधुनिक विज्ञानयुगांत राज्यसत्ता इतकी प्रबळ व सर्वंकष झाली आहे कीं तिच्या सहकार्याखेरीज खाजगी प्रयत्न नेहमीच तोकडे व क्षीणबल ठरतील. शिक्षणसंस्था व वृत्तपत्रें यांच्यावरील निर्बंध, दळणवळणाचीं साधनें, नभोवाणी यांमुळें लोकमताला वळण लावण्याचें प्रचंड सामर्थ्य राज्यसंस्थेंत एकवटलें आहे. लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य इत्यादि अंतिम मूल्यांच्या दृष्टीनें शासनसंस्थेच्या ठिकाणीं केंद्रित होणारी ही अमर्याद सत्ता तत्त्वतः अनिष्ट असेल; पण अनेक गुंतागुंतीच्या परस्परविरोधी हितसंबंधांनीं गजबजलेल्या हल्लींच्या सामाजिक व्यवहारांत दुर्बलांच्या व दलितांच्या रक्षणाकरितां हस्तक्षेप करणें हें शासनसंस्थेचें आद्यकर्तव्य आहे याबद्दल आतां फारसें दुमत राहिलेलें नाहीं; किंबहुना लोककल्याणकारी राज्य या नांवाखालीं शासनसंस्थेला उत्तरोत्तर वाढते अधिकार प्राप्त होत आहेत. म्हणून शासनसंस्थेची सर्वंकषता ही आपत्ति खरी; पण ती अटळ, आवश्यक अशी इष्टापत्ति आहे असेंच आपण धरून चाललें पाहिजे. आणि समाजसुधारणेसाठीं ती कशी राबवितां येईल याचा विचार केला पाहिजे. केवळ खाजगी व्यक्ति आणि संस्था यांच्या निष्ठेवर व कर्तृत्वावर विसंबून सामाजिक पुनर्घटनेचें बिकट कार्य तडीस जाणार नाहीं.

' मतपरिवर्तन, हृदयपरिवर्तन व परिस्थितिपरिवर्तन ' हा आचार्य विनोबांचा समाजपरिवर्तनाच्या साधनत्रयीचा त्रिकोण सुप्रसिद्ध आहे. कांहीं थोर उदारचरित साधुसंत समाजांत सद्भावनांचें बळ वाढवूं शकतील; बुद्धीला व भावनेला आवाहन करून किंवा सत्याग्रहाचा मार्ग अवलंबून थोड्याफार प्रमाणांत मतपरिवर्तन किंवा हृदयपरिवर्तन घडवून आणूं शकतील. पण युक्तिवादाच्या, सेवेच्या व सत्याग्रहाच्या सामर्थ्यालाहि कांहीं मर्यादा आहेत हें विसरून चालणार नाहीं. अज्ञान, मनोदौर्बल्य व स्वार्थबुद्धि हे पुराणमतवादाचे मुख्य आधारस्तंभ आहेत. हे तिन्ही परस्परांचें बळ वाढविणारे आहेत. अज्ञान नाहीसें करण्यासाठीं शिक्षणाचा, युक्तिवादाचा उपयोग होईल. मानसिक दुर्बलता कमी करण्यास सत्याग्रहाचा मार्ग उपकारक ठरेल. पण जेथें निव्वळ स्वार्थाचा, अन्याय्य हितसंबंधांचा प्रश्न असेल, तेथें वरील दोन्ही साधनांचा कितपत प्रभाव पडेल याबद्दल शंका वाटते. केवळ भावना ही बहुधा अंध असते; क्वचित् आततायीहि बनते. बुद्धि ही विकारवश होऊन स्वतःची व दुसऱ्याची फसवणूक करते; कधींकधीं विकलीहि जाते. म्हणून व्यक्तींच्या बुद्धीवर व भावनेवर सारी भिस्त ठेवून सामाजिक प्रश्न सुटणार नाहींत. लोकशिक्षण, जनसेवा, सत्याग्रह ह्या त्रिविध साधनांचा होईल तेवढा उपयोग करून घेण्यास कांहींच हरकत नाहीं. पण आपल्या सुस्त, जड व स्थितिप्रिय समाजांत नवचैतन्य निर्माण करावयाचें असेल, तर प्रथम परिस्थितींत परिवर्तन घडवून आणलें पाहिजे. त्यासाठीं राज्यसंस्थेच्या कायद्याची मदत घ्यावी लागेल. खऱ्या लोकशाही राज्यांतील कायदा लोकमतापासून फार दूर नसतो. उलट, ज्या संस्थांचा व रूढींचा नैतिक पाया ढासळलेला आहे, त्यांवर त्वरित घाव घालून कायदा देशांतील प्रतिगामी शक्तींना नामोहरम करतो; आणि बहुजनसमाजांत सुप्त असलेल्या








नैतिक शक्ति जागृत करून त्याला क्रियाशील बनवितो. परंपरागत संस्कारांचीं बंधनें तोडण्याच्या बाबतींत आपला समाज स्वयंस्फूर्तीनें फार मोठी मजल मारील हें संभवनीय नाहीं. म्हणून आपल्या सामाजिक पुन-र्घटनेंत राज्यसत्तेच्या प्रेरणेला व प्रयत्नांना अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे. खाजगी व्यक्तींचे व संस्थांचे प्रयत्न या कार्याला पुरे पडणार नाहींत. फार तर शासनसंस्थेच्या प्रयत्नांना ते पूरक ठरतील. अर्थात् राज्यसंस्थेच्या साहाय्यानें समाज-सुधारणा घडवून आणण्यांत एक धोका आहे. तो असा कीं आपलें जीवन आपण स्वतःच्या इच्छेप्रमाणें व स्वतःच्या प्रयत्नानें घडवावें ही ईर्ष्याच लोकांमधून नष्ट होऊन ते शासनसंस्थेच्या हातांतील बाहुलीं बन-ण्याची शक्यता आहे. हें घडूं नये म्हणून सत्तेचा मोह झुगारून देणाऱ्या, पण राजकारणाबद्दल आस्था बाळगणाऱ्या तत्त्वचिंतकांनी व समाजसेवकांनीं राज्यसत्तेशीं शक्य तेथें मनःपूर्वक सहकार्य करण्याचें व जरूर तेथें सनदशीरपणें विरोध करून राज्यसत्तेवर न्याय्य दडपण आणण्याचें लोकांना शिक्षण दिलें पाहिजे. याशिवाय दुसरा कोणताच श्रेयस्कर व फल-दायी मार्ग नाहीं.

## ऐहिक जीवननिष्ठा

महाराष्ट्राची व भारताची लोकशाहीच्या मार्गानें सर्वांगीण प्रगति व्हावी अशी अपेक्षा असेल, तर आपल्या समाजांतील परमार्थाचें बंड कमी करून ऐहिक जीवनाबद्दल लोकांच्या मनांत निष्ठा उत्पन्न केली पाहिजे. व्यक्तीचा विकास, समाजाचा अभ्युदय, राष्ट्राचा उत्कर्ष हाच परमपुरुषार्थ आहे अशी श्रद्धा त्यांच्या अंगीं बाणली पाहिजे. विज्ञानपूर्व मूल्यकल्पने-मध्यें ऐहिक जीवनाला गौण स्थान होतें. प्रपंच हा पर-लोकाचें, मोक्षाचें साधन म्हणून गणला जाई. भारतीय परंपरेंत प्रवृत्ति–निवृत्तींचीं दोन आत्यंतिक टोकें दृष्टीस पडतात. एका टोकाला उदरभरण, भोगविलास हेंच सर्वस्व मानणारे अज्ञजन, आणि दुसऱ्या टोकाला सर्वसंगपरित्याग करून परमार्थसाधनांत गढून गेलेले विरक्त संन्यासी. आपल्या सामाजिक व्यवहारांत सदाचाराला, ‘ अभयं सत्त्वसंशुद्धिः ’ इत्यादि सद्गुणांना श्रेष्ठ स्थान होतें हें खरें. परंतु त्या सदाचाराचें, सद्गुणांचें लक्ष्य–केंद्र पुण्यसंचय व परलोक हें होतें. विज्ञानपूर्व युगांत तसें असणें स्वाभाविकहि होतें. वैज्ञानिक प्रगतीच्या अभावीं भौतिक साधनांची वाढ झालेली नव्हती. बहुजनसमाजाच्या जीवनांत काबाडकष्ट आणि हालअपेष्टा यांखेरीज दुसरें कांहींच नव्हतें. अशा वेळीं पारलौकिक सुखाच्या कल्पनेंत रंगून जाऊन त्यांनीं दुःखमय ऐहिक जीवनांतील उणीव भरून काढली असल्यास नवल नाहीं. पण आज जेव्हां वैज्ञानिक संशोधनानें सर्वांच्या जीवनांतील दैन्य व दुःख कमी करण्याची शक्यता निर्माण झाली आहे, तेव्हां व्यक्तीचा आणि समाजाचा सर्वांगीण विकास हेंच ध्येय प्रत्येकानें डोळ्यापुढें ठेवलें पाहिजे. ‘सर्वांचा संसार सुखाचा करणें हेंच जीवितसाफल्य होय,’ हें धर्मनिरपेक्ष सामाजिक मूल्य जनमनांत खोलवर रुजलें पाहिजे.

‘ ऐहिक निष्ठा प्रबळ झाल्यास आत्मशुद्धीला व सदाचाराला प्रेरणा कोठून मिळणार ? भौतिकवादामुळें सुख आणि भोग यांतच रममाण होण्याच्या प्रवृत्तीला प्रोत्साहन मिळून आतांपर्यंत मानवानें ज्या उच्चतर सांस्कृतिक मूल्यांची महत्प्रयासानें जोपासना केली आहे, तीं नामशेष होतील ’ – अशी शंका पुष्कळदां व्यक्त केली जाते. पण या ठिकाणीं भौतिकवाद्यांच्या भूमिकेचा अभावितपणें कां होईना, पण विपर्यास होत आहे. भौतिकवाद म्हणजे जडवाद, भोगवाद किंवा सुखवाद नव्हे. मनुष्याच्या व्यक्तित्वाचा सर्वांगीण विकास हेंच भौतिकवादाचें उद्दिष्ट आहे. इंद्रियांची कार्यक्षमता व स्वाधीनता, मनाची शुद्धता व प्रसन्नता, बुद्धीची सूक्ष्मता व विवेकपरता, सहजप्रेरणांचें शमन व दमन, परिपूर्ति व संस्करण ह्या सर्व गोष्टी सर्वांगीण विकासाच्या कल्पनेंत अभिप्रेत आहेत. माणसांना एकमेकांबद्दल वाटणारी सहानुभूति, दुसऱ्याच्या सुख-दुःखांशीं समरस होण्याची त्यांची अंतःप्रवृत्ति, आणि भोगाइतकेंच त्यागाबद्दल व सत्तेइतकेंच समर्पणा-बद्दल त्यांना वाटणारें आकर्षण यांवर सदाचाराची व नीतिमत्तेची खचित उभारणी करतां येईल. त्यासाठीं परलोकाचें वा परमेश्वराचें अधिष्ठान कल्पिण्याची गरज नाहीं, अशी भौतिकवाद्यांची निष्ठा आहे. स्वातंत्र्य, समता, बंधुता या उदात्त तत्त्वांचा केवळ कल्पनेंत नव्हे, तर प्रत्यक्ष लोकव्यवहारांत सर्वांना साक्षात्कार घडावा म्हणून ज्यांनीं आपल्या लेखणीनें



अनुक्रमणिका






व वाणीनें समाजांत विचारक्रांति केली, ते भौतिकवादी तत्त्वज्ञ; आणि प्रयोगशाळेंत स्वतःला डांबून घेऊन रात्रंदिवस संशोधनांत मग्न असणारे ऋषितुल्य शास्त्रज्ञ — यांचीं चरित्रें आणि शिकवण पाहिल्यास ऐहिक जीवननिष्ठा हाहि एक ध्येयवाद आहे याची प्रचीति येईल. अध्यात्मानें प्रशंसिलेले नैतिक सद्गुण कोणाला नको आहेत ? फक्त सामाजिक कर्तव्यबुद्धीच्या नव्या जाणिवेनें ते उजळले जावेत एवढीच भौतिकवाद्यांची अपेक्षा आहे. ऐहिक जीवननिष्ठेची ही विचारसरणि आपल्या समाजांत सुखासुखीं रुजेल असा भाबडा आशावाद कोणींहि बाळगूं नये. ही विचारसरणि लोकांच्या पचनीं पडण्यास पुष्कळच कालावधि लागेल. तरीपण मधला टप्पा म्हणून समाजधर्म आणि मोक्षधर्म यांची फारकत झाली आणि मोक्षधर्म व्यक्तीपुरताच मर्यादित राहून सामाजिक व्यवहारांतील त्याची लुडबुड थांबली, तर आपण बराच पल्ला गांठला असें म्हणतां येईल.

### सांस्कृतिक विषमता

महाराष्ट्रांतील सामाजिक ऐक्याच्या व प्रगतीच्या मार्गांतील एक मोठी धोंड म्हणजे जातीयता होय. ती दूर करावयाची असेल, तर समाजाच्या निरनिराळ्या थरांतील सांस्कृतिक विषमता कमी करण्यासाठीं कसोशीनें प्रयत्न केले पाहिजेत. सार्वत्रिक मताधिकारामुळें आतां राजकीय समता तत्त्वतः स्थापित झाली आहे. आर्थिक समता अद्याप दृष्टिपथांत आलेली नसली तरी त्या दिशेनें मंदगतीनें कां होईना, पण पुढें पाऊल पडत आहे. सत्ता व संपत्ति हस्तगत करण्याची बहुजनसमाजांतील सुशिक्षितांत सध्यां जी ईर्ष्या व आकांक्षा दिसून येत आहे, ती निःसंशय स्वागतार्हच आहे. परंतु कोणत्याहि समाजांत स्वातंत्र्य व सुबत्ता आहे, एवढ्यावरूनच त्याला जगांत मानाचें स्थान मिळत नाहीं. स्वतंत्र प्रज्ञेच्या जोरावर मानवी प्रगतीला हातभार लावणारे, जगाच्या ज्ञानांत भर घालणारे, तत्त्वमीमांसा, साहित्यनिर्मिति, कलोपासना यांच्या द्वारें सांस्कृतिक मूल्यांची जोपासना करणारे शास्त्रज्ञ, तत्त्ववेत्ते आणि कलावंत एखाद्या समाजांत किती निर्माण होतात ह्यावर त्याचें खरें मोठेपण अवलंबून आहे. पाश्चात्त्य देशांच्या मानानें या बाबतींत आपण पुष्कळच मागासलेले आहोंत. परंतु भारतांतील इतर प्रांतांची बरोबरी करण्याइतकी तरी महाराष्ट्राची सांस्कृतिक परंपरा खासच उज्ज्वल आहे. मात्र ह्या परंपरागत सांस्कृतिक धनाचा वारसा गेलीं कित्येक शतकें ब्राह्मण व तत्सम वरिष्ठ जाती यांच्याच हातीं आहे. आपल्या अभंगवाणीनें महाराष्ट्रांतील असंख्य भाविकांचीं मनें वेधून घेणारे नामदेव–तुकारामांसारखे लोकप्रिय संतकवी बहुजनसमाजांत होऊन गेले. परंतु ज्ञानेश्वर-वामनांसारखे तत्त्वज्ञ आणि एकनाथ-दासोपतांसारखे व्युत्पन्न टीकाकार अजून निर्माण व्हावयाचे आहेत. विद्येची मक्तेदारी जोंपर्यंत उच्चवर्णीयांकडेच होती तोंपर्यंत असें होणें स्वाभाविक होतें. पण इंग्रजी अमदानींतहि ह्या परिस्थितींत म्हणण्यासारखा फरक पडला नाहीं. इंग्रजी राजवट आली आणि गेली; पण आजहि अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान, भौतिकशास्त्रें इत्यादि क्षेत्रांत महाराष्ट्राचे प्रतिनिधी म्हणून अखिल भारतांत ओळखले जाणारे बहुजनसमाजांतील लोक ( एक फक्त डॉ. आंबेडकर वगळल्यास ) किती मिळतील हा प्रश्न आहे. त्यामुळें बहुजनसमाजांतील सुशिक्षितांत एक प्रकारचा न्यूनगंड दिसून येतो. म्हणून ही सांस्कृतिक विषमता कमी करण्यासाठीं चिकाटीनें व पद्धतशीर खटपट केली पाहिजे बहुजनसमाजांतील बुद्धिमान् व ध्येयवादी कार्यकर्त्यांनीं यापुढें सांस्कृतिक जीवनांतील आपला वाटा अधिकाधिक प्रमाणात उचलला पाहिजे. कोणत्याहि प्रगत समाजाकडे पाहिलें, तरी उच्च सांस्कृतिक मूल्यांचे असे राखणदार नेहमी थोडेच असतात. तेव्हां सत्ता आणि संपत्ति यांच्यासाठीं हिरिरीनें स्पर्धा करणारे हजार लोक बहुजनसमाजांतून पुढें आले तर हवेच आहेत. पण त्याबरोबर अधिकार व पैसा कःपदार्थ मानून सांस्कृतिक कार्यांत शक्तिसर्वस्व वेचणारा एक तरी मनुष्य निघाला पाहिजे. " Ye are the salt of the earth; ye are the light of the world " या शब्दांत येशू ख्रिस्तानें अशा थोर समाजसेवकांचा गौरव केला आहे. त्यांच्या पुण्याईनें व तपस्येनेंच समाजजीवन सकस बनतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, उदारता, सहिष्णुता, निर्भयता, त्याग, धडाडी हे ध्येयसाधनेला आवश्यक असणारे गुण बहुजनसमाजांत नाहींत. आजपर्यंत जे राजकीय व आर्थिक लढे झाले, ते बहुतांशीं बहुजनसमाजाच्या बळावरच लढविले गेले



अनुक्रमणिका








नाहींत कां ? बहुजनसमाजांत त्यागी व निष्ठावंत कार्यकर्त्यांची उणीव नाहीं; तर त्यांना नवी दृष्टि व प्रेरणा देऊं शकतील अशा तत्त्वचिंतकांची व नेत्यांची वाण आहे. लोकक्षोभाची क्षिति न बाळगतां निःस्पृहतेनें व निःसंदिग्धपणें स्वकीयांचें दोषाविष्करण करणारे फुले-आगरकरांसारखे निदान दहा तत्त्वनिष्ठ सुधारक पुढील वीस वर्षांत बहुजनसमाजाला लाभले, तर महाराष्ट्राच्या इतिहासांत या कालखंडाची नोंद सुवर्णाक्षरांनीं करावी लागेल. अशा तऱ्हेचे लोकोत्तर पुरूष हुकमी पैदा होत नाहींत हें खरें आहे. पण ध्येयनिष्ठेचें व तत्त्वचर्चेचें वातावरण एकदां देशांत निर्माण झालें, तर आज ना उद्यां बहुजनसमाजांत असे विचारवंत खात्रीनें उत्पन्न होतील.

## विभूतिपूजा

लोकशाहीचें यश हें मुख्यत: देशांतील सामान्यजनांच्या विवेकबुद्धीवर व निर्णयशक्तीवर अवलंबून आहे. म्हणून नेत्यांचें व्यक्तिमत्त्व कितीहि अलौकिक असलें, तरी त्यांचे विचार व धोरण पारखून पाहाण्याची लोकांना संवय लावली पाहिजे. जेथें जेथें बुद्धिमत्ता, पराक्रम, कल्पकता, त्याग, मनोनिग्रह इत्यादि गुणांचा प्रकर्ष दिसून येतो, तेथें तेथें दैवी अंश कल्पिण्याची प्रवृत्ति आपल्या समाजांत सर्वत्र आढळते. त्यामुळें थोर पुरुषांचें यथार्थ मूल्यमापन होण्याऐवजीं त्यांची भक्ति व पूजा सुरू होते. अशा विभूतिपूजेला आळा घातल्याखेरीज लोकशाही, विचारस्वातंत्र्य, स्वयंनिर्णय या तत्त्वांचा समाज-जीवनांत प्रभाव दिसणार नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, द्रष्टेपणाची कदर करूं नये, तज्ज्ञांवर विश्वास ठेवूं नये. प्रत्येक माणसाला हरएक विषयांतील सर्व कांहीं कळूं शकत नाहीं. आधुनिक विज्ञानयुगांत निरनिराळ्या शास्त्रांच्या शाखा इतक्या विस्तारलेल्या आहेत कीं, त्या त्या शाखेंतील तज्ज्ञांच्या साहाय्याची व्यवहारांत पदोपदीं गरज पडते. अशा तज्ज्ञांच्या मताबद्दल वाटणारा विश्वास आणि आदर म्हणजे विभूतिपूजा नव्हे. पण एखाद्या क्षेत्रांत आपल्या कर्तृत्वानें लोकांचे डोळे दिपवून टाकणाऱ्या जगन्मान्य युगपुरुषाला, सर्वज्ञ समजून त्याच्या कार्यक्षेत्राबाहेरहि प्रत्येक बाबतींत त्याचे निष्कर्ष व प्रमाण मानणें ही विभूतिपूजा होय; आणि तिला आपल्या उच्चारांत, विचारांत व आचारांत कोठेंच स्थान मिळणार नाहीं म्हणून सदैव खबरदारी घेतली पाहिजे.

## बुद्धिवाद

आपल्या सामाजिक प्रगतीला विभूतिपूजेइतकेंच शास्त्रप्रामाण्यहि विघातक आहे. गेल्या दीड हजार वर्षांत गौडपाद, शंकराचार्य, रामानुज, ज्ञानेश्वर, टिळक यांच्यासारखे अनेक थोर तत्त्वज्ञ व भाष्यकार होऊन गेले. त्यांनीं आपल्या मतांचा हिरीरीनें पुरस्कार केला. पण त्यांनींसुद्धां उपनिषदांच्या, ब्रह्मसूत्रांच्या व गीतेच्या चौकटींतच हें कार्य केलें. पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यांनीं आपल्या विचारसरणीची स्वतंत्रपणें बांधणी केली. उलट, आपल्यांतील मध्ययुगीन व आधुनिक विचारवंतांनीं आपण वैदिक तत्त्वज्ञानाचा आशय स्पष्ट करीत आहोंत, गीतेचें रहस्य उलगडून दाखवीत आहोंत-अशी भूमिका स्वीकारली. त्यामुळें नवे विचार निःसंकोचपणें ग्रहण करण्याची, नव्या कल्पना प्रांजलपणें आत्मसात् करण्याची प्रथा रूढ झाली नाहीं. त्यामुळें प्रत्येक तत्त्वमीमांसकाला नवा विचार जुन्या सांच्यांत कोंबण्याची बौद्धिक कसरत करावी लागली. ही बौद्धिक कसरत म्हणजे बुद्धिवाद नव्हे. सत्यासत्याचा, कार्याकार्याचा, नीति-अनीतीचा निर्णय करण्याचें एकमेव साधन म्हणजे मानवाची विवेचकबुद्धि होय. श्रद्धा, भावना, अंतःप्रेरणा यांची उपेक्षा करणें इष्ट नाहीं हें खरें. परंतु त्यांनीं दिलेला कोणताहि कौल स्वीकारण्यापूर्वीं बुद्धीचें पूर्ण समाधान झालें पाहिजे अशी बुद्धिवाद्यांची विचारसरणि आहे. मानवी बुद्धि ही स्खलनशीलच आहे. तिच्या सामर्थ्याला खूप मर्यादा आहेत. म्हणून प्रयोगशीलता व परिवर्तनक्षमता या दोन गुणांची तिनें कास धरली पाहिजे. बुद्धिवादावर आणखीहि बरेच आक्षेप घेतां येतील. परंतु सत्यान्वेषणाच्या कामीं पूर्वग्रहरहित, स्वार्थनिरपेक्ष व वस्तुनिष्ठ दृष्टीनें विचार करणाऱ्या विवेचक बुद्धीखेरीज माणसापाशीं दुसरें कोणतेंच त्यांतल्या त्यांत विश्वसनीय साधन नाहीं.

## जातिसंघटना

जाति, पक्ष, प्रदेश, वर्ग यांतील कलह संपून समाजांत सगळीकडे सलोख्याचें व सहकार्याचें वातावरण नांदावें याबद्दल कोणाचाच मतभेद होणार नाहीं. परंतु वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करून स्वप्नाळु वृत्तीनें ऐक्याचा नुसता उद्घोष करीत राहिल्यानें भांडणें मिटणार नाहींत. दलितांची व पीडितांची मनःस्थिति











विचारांत न घेतां त्यांच्यापुढें सद्भावनांचे व समजूतदारपणाचे कितीहि गोडवे गाइले तरी तें अरण्यरुदनच ठरेल. समाजांत जोंपर्यंत अन्याय व विषमता आहे. तोंपर्यंत झगडे होत राहणारच. ते शांततेनें, पद्धतशीरपणें व जबाबदारीनें कसे चालविले जातील याची काळजी कार्यकर्त्यांनीं व पुढाऱ्यांनीं घेतली पाहिजे. आदिवासी व अस्पृश्य समाज सोडला, तर बहुजनसमाजांतील पुढारलेल्या वर्गांनी व उच्चवर्णीयांनीं आपापल्या जातिसंघटनांचें प्रथम विसर्जन केलें पाहिजे आणि आधुनिक कालाच्या प्रवाहाशीं सुसंगत अशा निरनिराळया व्यवसायांच्या व वर्गांच्या संघटनांचा पुरस्कार केला पाहिजे. जातिसंघटना ह्या पूर्वीच्या व्यावसायिक संघटनाच होत. अर्थव्यवस्था बदलल्यानें त्या आतां प्रतिगामी व हानिकारक झाल्या आहेत. समाजांतील अंतःकलह कायद्यांत ठेवून त्याला योग्य वळण लावावयाचें असेल, तर नव्या संघटना प्रभावी व कार्यक्षम बनविल्या पाहिजेत.

संकल्पित महाराष्ट्रांत विदर्भ आणि मराठवाडा हे दोन नवे प्रदेश येत आहेत. त्यामुळें कांहीं तात्कालिक प्रश्न उपस्थित होतील. तथापि सर्व प्रदेशांपुढील मूळ समस्या सारख्याच आहेत; आणि त्या सोडवावयाच्या, तर वरील विवेचनानुसार एका सर्वस्पर्शी व्यापक भूमिकेवरून उपाययोजना केली पाहिजे. निव्वळ राजकीय व आर्थिक कारणासाठींच नव्हे, तर सांस्कृतिक विकासासाठीं देखील मुंबई महाराष्ट्राला मिळणें जरूर आहे. मुंबई हें औद्योगिक संघटनांचें व आधुनिक विचारप्रवाहांचें केंद्र असल्यामुळें तिच्या नेतृत्वाचा महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनावर योग्य व इष्ट असाच परिणाम होऊन जातीयता नष्ट होण्यास मदत होईल.

---

## ' राज्य ' नको ' प्राज्य ' हवें

" सर्वोदय समाजानें हें कोडें सोडविण्याचा मार्ग दाखविला पाहिजे. तें सोडविण्याची शक्ति असलेल्या लोकनीतीची स्थापना केली पाहिजे; म्हणजे राजनीतीची समाप्ति केली पाहिजे. गोखले आणि गांधी यांनीं राजकारणाला आध्यात्मिक बनविण्याचा प्रयत्न केला. गांधीजींनीं राजनीतीला शुद्ध नीति बनविण्याचा प्रयोग केला. महंमद पैगंबरांनींहि पूर्वी असाच प्रयत्न केला होता. पण ' राज ' आणि ' नीति ' हे दोन्हीं शब्द एकमेकाला छेद देणारे आहेत. नीति येते तेथें राज्य संपतें आणि राज्य येतें तेथें नीति संपते. म्हणून मी म्हणतों कीं आतां ' राज्य ' नको, ' प्राज्य ' हवें आहे. तुम्ही म्हणाल कीं हें केव्हां होणार ? तुमचा प्रश्न गैर नाहीं, पण मी सांगेन मला माहींत नाहीं. ' मेरे तो मुख राम नाम दूसरो न कोई. ' सर्वोदय समाजानें दुसरें कांहीं म्हणतांच कामा नये.

" गांधीजींचे साथी मोहग्रस्त झालेले आहेत. राज्य चालविलेंच पाहिजे अशी त्यांची श्रद्धा बनलेली आहे. हा सर्वोदयाचा विचार नाहीं. सर्वोदयवादी सत्ता हातीं येतांच तिचें विलयन करण्यास प्रारंभ करील. तें पूर्णतया किती काळांनीं सिद्ध होईल याची ते चिंता करणार नाहींत. नाहीं तर मार्क्सवादी कम्युनिस्ट देखील 'राज्यसत्ता पूर्णतया लोप पावली पाहिजे' असें मानतातच, पण प्रत्यक्ष दैनंदिन व्यवहारांत राज्यसत्ता अधिकाधिक बलशाली व्हावी अशी नीति अवलंबितात. म्हणजे रोखी सत्ता आणि उधार विलय असा त्यांचा व्यवहार असतो. ही उधारी वसूल होण्याचीं चिन्हें दिसत नाहींत. गांधीवादी म्हणविणारे कांहीं लोक राज्यसत्तेसंबंधीं असाच कांहींसा भ्रम बाळगीत असल्याचें दिसतात. राज्यसत्ता निरंतर राहिली पाहिजे हेंच त्यांचें गृहीतकृत्य असतें. ती चांगली, उपकारी, लोककल्याणकारी बनवावी असा त्यांचा प्रयत्न असतो. हा विचार त्याज्य आहे, किंवा दुष्ट आहे असें मी म्हणत नाहीं. पण हा सर्वोदय किंवा गांधीविचार नाहीं असें मी स्पष्टपणें सांगतों. गांधीवादावर वादविवाद करण्याची माझी इच्छा नाहीं. कारण त्यायोगें बुद्धशिष्यांचे चारांचे चाळीस पक्ष झाले तसे येथें होतील.

—आचार्य विनोबा

[ कांचीपुरम्-सर्वोदय संमेलन २९।५।५६ ]








अँटन चेकॉव्ह : अनु.–श्री. तु. शं. कुलकर्णी

# डॉ. योनिच्

## : १ :

नवीन आलेले प्रवासी त्या बकाल शहराच्या रूक्ष-पणाविषयीं नाकें मुरडीत परंतु तिथल्या रहिवाशांना मात्र तें शहर एखाद्या नंदनवनासारखें वाटे. त्या गांवांत वाचनालय, थिएटर्स, क्लब इत्यादि सुखसोयींचीं साधनें उपलब्ध असल्यामुळें एकंदर जीवनांतच मौज होती. याखेरीज तिथें चांगलीं सुसंस्कृत कुटुंबें होतीं – सहवासायोग्य माणसें होतीं. टर्किन कुटुंब यापैकींच एक होतें.

टर्किन कुटुंब गांवाच्या मध्य भागांत राहत होतें. गव्हर्नर त्यांच्याच शेजारीं होता आणि शिवाय तो ज्या घरांत राहत होता तें घरदेखील टर्किन कुटुंबाच्याच मालकीचें होतें. इव्हान पेट्रोव्हिच् हा घरचा करता-सवरता पुरूष होता. अंगानें सुटलेला होता पण देखणा होता. त्याच्या मालकीचीं कांहीं थिएटर्स होतीं आणि तो तीं अधुनमधून साहाय्यार्थ देत असे. त्याचा स्वभाव विनोदी होता. हुकुमी कोटया, चुटके, म्हणी यांचा तो बोलतांना वापर करायचा. त्याचे श्रोते विनो-दामुळें पोट धरधरून हंसत. पण तो स्वतः मात्र गंभीर दिसायचा. त्याची बायको वेरा योसिफोना ही एक प्रसन्न चेहऱ्याची बाई होती. ती कथा-कादंबऱ्या लिहीत असे आणि भेटायला आलेल्या माणसांना आपलें लिखाण ती मोठ्या उत्सुकतेनें वाचून दाखवीत असे. येकातेरिना इव्हानोव्हना ही त्याची मुलगी. ती पियानो वाजवण्यांत तरबेज होती. टर्किन कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीला गुणांची देणगी मिळालेली होती. पाहुण-चारासाठीं त्यांची विशेष ख्याति होती. त्यांच्या घराच्या पिछाडीला एक बाग होती आणि वसंतऋतूंत पक्ष्यांच्या गाण्यांनीं सारें आवार भारलेलें असे.

मेडिकल ऑफिसर म्हणून नुकतीच नेमणूक झालेला डॉ. द् मित्री योनिच् स्टारट्झेव्ह हा शहरापासून सहा मैलांच्या अंतरावर असलेल्या डियालिझ या उपनगरांत राहत होता. तिथें आल्याबरोबर त्याला टर्किन कुटुंबाची माहिती मिळाली होती. हिवाळयांत-ल्या एका दुपारीं त्याची आणि इव्हान पेट्रोव्हिच्‌ची ओळख झाली होती. हवामान, थिएटर, कॉलरा इत्यादि किरकोळ विषयांवर त्यांचें संभाषण झालें होतें. निरोपाच्या वेळीं पेट्रोव्हिच्‌नें डॉक्टरला घरीं येण्याचें आमंत्रण दिलें. एका सुट्टीच्या दिवशीं डॉ. योनिच रोग्यांची प्रकृति तपासून शहरांत निघाला. तो चालत जात होता. ( कारण त्याचें स्वतःचें वाहन नव्हतें ) – चालतांना तो स्वतःशींच कांहींतरी गुणगुणत होता.

शहरांतील एका हॉटेलांत जेवण घेत असतांना डॉक्टरला पेट्रोव्हिच्‌नें दिलेल्या आमंत्रणाची आठवण झाली आणि मग तो तडक टर्किन कुटुंबाकडे निघाला.

" या – या डॉक्टर ! " – त्याला व्हरांड्यांत बघतांच पेट्रोव्हिच्‌नें त्याचें स्वागत केलें. आपल्या स्वभावानुसार पेट्रोव्हिच् एकसारखा बडबडत होता. बायकोची ओळख करून दिल्यानंतर तो तिला म्हणाला – " बरें का ग ! डॉक्टरांना मी सांगून टाकलं – सारा वेळ दवाखान्यांत बसत जाऊं नका म्हणून ! वेळ मिळतांच चार-चौघांत मिसळत जा म्हटलं. खरें कीं नाहीं ? " –

एक खुर्ची ओढून वेरा योसिफोना म्हणाली – " बसा ना डॉक्टर. "

डॉक्टर खुर्चीत बसल्यानंतर पेट्रोव्हिच् म्हणाला – " माझ्या पत्नीनें नुकतीच एक कादंबरी हातावेगळी केली आहे – आतां ती सर्वांना वाचून दाखवणारच होती – तुम्ही मोठ्या चांगल्या वेळेला आलां बुवा ! "

नवऱ्याच्या या प्रशंसेवर वेरा योसिफोना लाडिक अभिनय करीत म्हणाली– " तुमचं आपलं कांहीं-तरीच ! "

यानंतर पेट्रोव्हिच्‌नें आपल्या मुलीची डॉक्टरला ओळख करून दिली. सडपातळ बांध्याची, हुबेहूब आईसारखी दिसणारी येकातेरिना इव्हानोव्हना अठरा वर्षांची तरुणी होती. तिचाहि चेहरा मोठा प्रसन्न,



अनुक्रमणिका






लहान मुलाप्रमाणें निष्पाप दिसत होता. तिचें शरीर भरायला सुरुवात झाली होती – घरचीं माणसें तिला किट्टन म्हणत.

सर्वांचा चहाफराळ आटोपला. बाहेर वावटळीमुळें धूळ उडायला लागली होती म्हणून सर्व माणसें आंत दिवाणखान्यांत आलीं.

वेरा योसिफोनानें आपली कांदबरी वाचायला प्रारंभ केला– " कडाक्याची थंडी पडली होती "... या वाक्यानें कादंबरीची सुरुवात झाली होती. स्वयंपाक-घरांत कुठले तरी विशेष पदार्थ तयार होत होते– उघड्या खिडक्यांतून त्यांचा खमंग सुवास येत होता.

उन्हाळयांतली संध्याकाळची वेळ होती. खोली मंद प्रकाशानें न्हाऊन निघाली होती. सर्वजण मजेंत होते आणि अशा वेळेला " कडाक्याची थंडी पडली होती- " या विसंगत वर्णनानें सुरू होणाऱ्या कादं-बरीचा आस्वाद घेणें कठीण होतें. सडकेवरील रहदारी आणि मोठमोठ्यानें हसण्याचे आवाज कानावर आद-ळत होते. वेरा योसिफोना एका सुस्वरूप श्रीमंत नायि-केच्या एका कलावंतावरील प्रेमाचें वर्णन करीत होती– कादंबरींतील गांवची शाळा, वाचनालय, दवाखाना इत्यादि गोष्टींचा तपशील निवेदन करीत होती. या सर्व गोष्टी कमालीच्या अवास्तव होत्या पण तरीहि सर्व लोक तिची कादंबरी ऐकण्यांत तल्लीन झाले होते. जागे-वरून उठण्याची कुणाचीच इच्छा नव्हती कारण वाता-वरण मोठें आल्हाददायक होतें. " कांहीं वाईट नाहीं. " पेट्रोव्हिच्नें अभिप्राय दिला.

कादंबरी ऐकण्यांत तल्लीन झालेला डॉक्टर विचा-रांच्या प्रवाहांत वाहत होता. पेट्रोव्हिच्च्या अभि-प्रायानें त्याची तंद्री भंग पावली – तोहि झटकन् बोलून गेला – " अगदीं बरोबर ! " –

एका तासानंतर दुसरा तास संपला. जवळच कुठून तरी ऑर्केस्ट्राचे सूर ऐकायला येत होते. वेरा योसि-फोनानें वही बंद केल्यानंतर पांच मिनिटें कुणी कांहींच बोललें नाहीं. सारीं माणसें ऑर्केस्ट्रावरील संगीतानें मंत्रमुग्ध झालीं होतीं. कादंबरींत ज्या जिवंतपणाचा अभाव होता तो या संगीतामुळें जास्तच तीव्र भासूं लागला. " तुमचें लिखाण कुठें मासिकांत छापून येतें कां ? -" डॉक्टरनें विचारणा केली.

" नाहीं ! मी अद्याप कुठेंच पाठवलें नाहीं ! - मी लिहितें आणि कपाटांत ठेवून देतें - आमचें उत्पन्न बऱ्यापैकीं असल्यामुळें छापायला पाठवायची गरजच भासली नाहीं - " तिनें स्पष्टीकरण केलें.

सर्वांनीं निष्कारणच सुस्कारा सोडला.

" ए पोरी ! आतां तूं आम्हाला पियानो ऐकव बघूं - " पेट्रोव्हिच्नें आपल्या मुलीला आज्ञा केली.

पियानोचें झाकण तिनें बाजूस ठेविलें. पियानोच्या फळीवर पुस्तकें व्यवस्थित रीतीनें ठेवलेलीं होतीं. येकातेरिना इव्हानोव्हनानें पट्ट्यांवरून बोटें फिरवलीं - मग ती जोरानें वाजवूं लागली. तिचे खांदे आणि वक्षःस्थळ हिंदकळत होतें. ती जोरजोरानें वाजवीत होती आणि असा भास होत होता कीं सबंध दिवाण-खाना विजेनें भरून गेला आहे - फर्निचर, खोलीचें छत या सर्व वस्तूंना विजेचा स्पर्श झाला आहे... एक कठीण संगीत प्रकार ती उत्तम रीतीनें वाजवीत होती. तें संगीत ऐकतांना डॉक्टरला असा भास होत होता कीं एका उंच पर्वतावरून खडकाचे प्रचंड तुकडे वेगानें खालीं घरंगळत आहेत... ते तिथेंच थांबावे अशी त्याची इच्छा होती ... वाजवण्यांत तल्लीन झालेल्या येकातेरिनाकडे तो बघत होता. परि-श्रमामुळें ती जास्तच तांबूस दिसत होती. केसां-च्या बटा तिच्या कपाळावर भुरभुरत होत्या यामुळें ती जास्तच आकर्षक भासत होती. सबंध हिवाळा डॉक्टरनें रोग्यांच्या सहवासांत घालवला होता. त्या कंटाळलेल्या अवस्थेंत आजचा सुंदर मुलीचा सहवास, पियानोवरील संगीत, सारें वातावरणच त्याला विलक्षण आल्हाददायक वाटत होतें.

" पोरी ! आज तूं तर कमाल केलीस बुवा ! – " पेट्रोव्हिच् म्हणाला. त्याच्या डोळयांत आनंदाश्रु तरळत होते. – " मात्र आणखी प्रगति व्हायला पाहिजे – " पेट्रोव्हिच् बोलायचा थांबला.

सर्वजण तिच्यावर अभिनंदनांचा वर्षाव करीत होते. आपण कितीतरी दिवसांत एवढें सुंदर संगीत ऐकलें नाहीं असें प्रत्येकजण म्हणत होता. येकातेरिना गप्प राहून हीं स्तुतिसुमनें झेलीत होती. तिच्या सुंदर चेह-ऱ्यावर स्मिताची रेषा उमटली होती.

" सुंदर ! फारच सुंदर ! " डॉक्टर देखील प्रशंसा करीत होता. " तुम्ही संगीताचें शिक्षण कुठें घेतलें ? – एखाद्या गायन-क्लासमध्यें ? – " त्यानें पृच्छा केली.








"नाहीं. सध्यां मी घरींच तयारी करतें आहें – मादाम झावलोस्का यांची शिकवणी आहे –" तिनें उत्तर दिलें.

"संगीताची पदवी-परीक्षा तुम्ही दिली आहे का ?" –

"नाहीं ना !" – डॉक्टरच्या प्रश्नावर आईनेंच उत्तर दिलें.

"आम्ही तिला घरींच शिक्षण देतों – शाळेंत आणि बोर्डिंगांत मुलींना वाईट वळण लागण्याचा संभव असतो–मुलींनीं आईबापाच्या आज्ञेंत राहावें असें मला वाटतें. –"

"पण माझीमात्र संगीत – शाळेंत जाण्याची इच्छा आहे हं !" येकातेरिना म्हणाली.

"तिच्या बोलण्याकडे लक्ष देऊं नका तुम्ही डॉक्टर ! ती कधींच आमच्या म्हणण्याच्याबाहेर जायची नाहीं –"

"मी जाणार ! शाळेंत शिकायला जाणार ! –" आपले पाय आपटीत येकातेरिना हट्टानें म्हणाली.

जेवतेवेळीं पेट्रोव्हिच्नें आपल्या स्वभावाची चुणूक दाखवायला प्रारंभ केला. तो कोट्या करूं लागला, विनोदी गोष्टी सांगूं लागला. माणसें एकसारखीं हसत होतीं.

"छान !" – बाहेर पडल्यानंतर डॉक्टर स्वतःशींच म्हणाला. एका उपाहारगृहांत जाऊन त्यानें बीर घेतली, आणि नंतर तो डियालिझकडे परत निघाला. रस्त्यानें चालतांना तो सतत गुणगुणत होता.

सहा मैलांची पायपीट करूनहि त्याला थकल्याप्रमाणें वाटत नव्हतें. गरज पडली असती तर आणखी सहा मैल चालण्याची त्याची तयारी होती.

## : २ :

टर्किन कुटुंबाकडे जाण्याची डॉ. योनिचची मनस्वी इच्छा होती – परंतु हल्लीं त्याला तासाचीहि सवड मिळत नव्हती. याच अवस्थेंत हां हां म्हणतां एक वर्ष संपलें. एके दिवशीं शहरांतून डॉक्टरला एक निळें पाकीट आलें.

गेल्या कांहीं दिवसांपासून वेरा योसिफोना डोकेदुखीनें आजारी होती. मुलगी संगीत – शाळेंत जाण्याचा हट्ट धरून बसल्यामुळें तिची डोकेदुखी आणखीनच वाढली होती. गांवांतील एकूण डॉक्टरांनीं तिच्या आजारावर उपाययोजना केली होती पण त्यांना यश आलें नव्हतें. आतां त्याची पाळी होती. वेरानें त्याला ताबडतोब घरीं येण्याबद्दल लिहिलें होतें. डॉक्टरला त्यांच्याकडे जाणें भागच होतें. तो त्यांच्या घरीं गेला आणि यानंतर वारंवार जाऊं लागला. खरें म्हणजे तोहि तिला संपूर्णपणें सुधारूं शकला नव्हता – पण त्याच्या औषधामुळें तिची डोकेदुखी थोडीशी कमी झाली होती. या एवढयाशा यशामुळें सर्वजण त्याच्या नैपुण्याची स्तुति करूं लागले. वेरा योसिफोनाच्या आजारामुळें नव्हे तर डॉक्टर आणखी एका निराळयाच कारणामुळें त्यांच्याकडे जात होता...

असाच एका सुट्टीच्या दिवशीं डॉक्टर त्यांच्या इथें गेला होता. येकातेरिनाचें पियानो-वादन नुकतेंच संपलें होतें. पेट्रोव्हिच् कुठलीतरी गोष्ट सांगत होता. इतक्यांतच दारावरील बेल खणाणल्यामुळें तो बाहेर गेला. या संधीचा फायदा डॉक्टरनें घेतला – तो किंचित्सा घाबरला होता. तो येकातेरिनाला हलकेच म्हणाला – "इथें भलताच उष्मा होतो आहे – आपण बागेमध्यें जाऊं या का ? –"

तिनें केवळ आपले खांदे उडवले. त्याचा हेतु तिला समजला नव्हता. ती जागेवरून उठली. तीं दोघेंहि बागेंत आलीं.

तुम्ही दररोज तीन चार तास मेहनत करतां आणि लगेच आईबरोबर गप्पा मारीत बसतां – यामुळें तुमच्याशीं बोलण्याची संधीच मिळत नाहीं – आतां तरी सवड आहे ना ? –"

शिशिरऋतु जवळ येऊन ठेपला होता. बाग कमालीची उदास दिसत होती. दिवस तसे कंटाळवाणे होते.

"एका आठवड्यापासून तुमची भेट झाली नाहीं – मला याचा किती त्रास होतो आहे याची तुम्हाला कुठून कल्पना असणार ? – खालीं बसा ! मला तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे –" डॉक्टरनें प्रारंभ केला.

"काय सांगायचय् तुम्हाला ?" तिनें थंडपणानें प्रश्न केला.

"गेला एकच आठवडा तुमची भेट झाली नाहीं परंतु असें वाटतें कीं आपल्या भेटीला अनेक वर्षें लोटलीं आहेत – तुमचे शब्द, तुमचा आवाज



अनुक्रमणिका






ऐकण्यासाठीं मी नेहमी आतुर असतों –" .

डॉक्टर तिच्या प्रफुल्ल चेहऱ्याकडे बघत होता. ती नेहमींसारखीच निष्पाप दिसत होती. तिची वेषभूषा आज त्याला निराळी वाटत होती. तिला वाचनाचें जबरदस्त वेड होतें. वाङ्मय, कला या विषयांवर तो नेहमी तिच्याशीं बोलत असे. बोलतांना मध्येंच उठून जाण्याची तिला खोड होती. तिच्या प्रत्येक कृतीवर डॉक्टर खूष होता. भेट झाल्यानंतर तो तिला नेहमी विचारायचा– आजकाल ती कुठलें पुस्तक वाचीत आहे– आणि ती कांहींतरी उत्तर द्यायची.

आतांहि त्यानें तोच प्रश्न केला– "गेल्या आठवड्यांत काय वाचन चाललें होतें ?"

"मी सध्यां पिझेमस्की वाचतें आहें–" तिनें उत्तर दिलें.

"त्याचीं नेमकीं कुठलीं पुस्तकें वाचीत आहां ?–"

"'एक सहस्र आत्मे–' पिझेमस्कीचं नांव किती गमतीचं आहे हो ! अलेक्झी फियोफिलाकतिच् !"– एवढें बोलून ती जागेवरून उठली.

"कुठें निघाला एवढ्यांतच ! अहो ! मला कांहीं सांगायचंय् तुम्हाला– पांच मिनिटें तरी थांबा ना !"–

ती क्षणभर थांबली आणि एक चुरगळलेला कागद त्याच्या हातांत देऊन आंत निघून गेली.

डॉक्टर वाचूं लागला. तिनें लिहिलें होतें– "आज रात्रीं अकराच्या सुमारास स्मशानाजवळ भेटा—डेमेट्रीच्या थडग्याजवळ – तुमची वाट बघेन."

डॉक्टर मनांतल्या मनांत म्हणाला– 'काय मूर्ख आहे ही पोरगी ! स्मशानाजवळ तिनें काय म्हणून बोलावलें आहे ? – दुसरें कुठलें स्थळ नव्हतें काय ?

ती त्याला मूर्ख 'बनवण्या'चा प्रयत्न करीत होती हें उघड होतें. रात्रींच्या एकांताच्या वेळीं गांवाबाहेर भेटण्याचें काय कारण होतें ? कुठेंहि जवळपास भेटणें तिला अगदीं शक्य होतें–

डॉ. योनिच् स्टारट्झेव चांगला मेडिकल ऑफिसर होता, बुद्धिमान् होता पण तो या पोरीसाठीं सुस्कारे सोडीत होता. स्मशानाजवळ भेटण्याबद्दल तिनें लिहिलें होतें आणि त्याचा या गोष्टीवर विश्वास बसला होता. शाळा-कॉलेजांतील तरुण पोरापेक्षांहि तो जास्त उच्छृंखल बनला होता. या प्रकरणांत तो कुठें वाहवत चालला होता ? – लोकांना ही गोष्ट समजली असती तर ते काय म्हणाले असते ? ... डॉक्टरच्या डोक्यांत विचारांचें वादळ उठलें होतें. तो याच अवस्थेंत क्लबमध्यें गेला होता–आणि रात्रीं बरोबर साडे अकरा वाजतां तो स्मशानाजवळ येऊन पोंचला होता.

आजकाल तो स्वतःच्या घोडागाडींतून फिरत होता. पॅनटेलीमॉन हा त्याचा गाडीवान् होता. बाहेर लख्ख चांदणें पडलें होतें. वातावरण स्तब्ध होतें. शिशिराची उष्णता चांदण्यांत देखील जाणवत होती- दूर कुठें तरीं कुत्रीं भुंकत होतीं. एका बोळापाशीं गाडी थांबवून डॉक्टर चालतच स्मशानाकडे निघाला. तो स्वतःशींच म्हणत होता– "प्रत्येकाच्या कांहींतरी विशिष्ट कल्पना असतात. – कुणास माहीत–येकातेरिना स्मशानांतहि भेटायला येईल ? तिचा स्वभाव मोठा लहरी आहे ! -" या विचारानें त्याला स्फूर्ति येत होती.

तो एका शेताच्या बांधावरून वाट तुडवीत होता. शेताच्या पलीकडे दगडाची एक पांढरी भिंत दिसत होती–भिंतीनंतर स्मशानाचेंच फाटक होतें ... चांदण्यांत देखील फाटकावर लिहिलेलीं अक्षरें स्पष्टपणें वाचतां येत होतीं– "तुमचीहि वेळ केव्हांन् केव्हां येणारच आहे–"

डॉक्टर फाटक उघडून आंत पोंचला, भोंवतालीं पांढऱ्याशुभ्र थडग्यांची रांगच्या रांग पसरलेली होती. जागोजागीं क्रूसांचा पहारा होता - आणि त्यांच्या सावल्या रस्त्याच्या मधोमध पडल्या होत्या. तिथली प्रत्येक वस्तु पांढऱ्या किंवा काळ्या रंगाची होती. थडग्यावर लिहिलेलीं अक्षरें स्पष्ट दिसत होतीं· डॉक्टर पहिल्याप्रथमच अशा जागीं आला होता. हें जग त्याला अगदींच नवखें होतें. इथलें चांदणें जास्त शीतल भासत होतें– –आल्हादक होतें. इथें जिवंतपणाचा मागमूस नव्हता– निर्जीव थडग्यांची रांगच्या रांग दृष्टीपुढें दिसत होती– सारें वातावरण मोठें गूढ वाटत होतें. –

भोंवतीं सारें शांत होतें. आकाशांतील तारे लुकलुकत्या डोळ्यांनीं सृष्टीला न्याहाळीत होते. चर्चच्या घड्याळांत टोल पडला आणि डॉक्टरची शांतता भंग पावली. त्याला उगीचच असें वाटलें कीं आपली मृत्यूची घटका समीप येऊन ठेपली आहे–आपण गेलीं अनेक वर्षें या निवांत जागेंत दीर्घ निद्रा घेत पडलों आहों– कुणीतरी आपल्याकडे बघत आहे असें त्याला वाटत होतें. मग क्षणभर त्याला असा भास झाला कीं



अनुक्रमणिका

ही शांतता, ही स्तब्धता खोटी असून या जागेचा कोपरान् कोपरा नैराश्यानें आणि मृत्यूमुळें निर्माण झालेल्या भयाण अवस्थेनें भरलेला आहे...

" डेमेट्रीचें थडगें जरा निराळया प्रकारचें होतें. तिच्या थडग्यावर एक दिवा टांगलेला होता–चांदण्यांत तो चमकत होता आणि असें वाटत होतें कीं त्यांत ज्योत तेवत आहे.

जवळपास कुणाचीच चाहूल नव्हती. एवढ्या रात्रीं कोण यायला बसलें होतें ?–पण डॉक्टर वाट बघत होता. या चांदण्यांत तो कल्पनेंतच आपल्या प्रेयसीला आलिंगनें देत होता–तो या थडग्याजवळ सुमारें अर्धा-तास बसून राहिला आणि नंतर हॅट हातांत घेऊन रस्त्यावर फेऱ्या मारूं लागला ....... किती तरी सुंदर स्त्रियांचीं आणि मुलींचीं हीं थडगीं असतील–त्यांच्यावरहि कितीकांचें प्रेम असेल – पण त्या स्त्रिया आतां चिरनिद्रा अनुभवीत आहेत – किती विचित्र आहे निसर्गाचा खेळ !... या विचारांनी डॉक्टरला आपल्या प्रेमाची तीव्रता जास्तच जाणवत होती. आपल्या प्रेमाचा वर्षाव करण्यासाठीं तो उत्सुक होता – हा एकांत त्याला बेचैन करून सोडत होता ...

एवढयांतच पडदा पडल्याप्रमाणें चंद्र ढगाच्या आड अदृश्य झाला. चहुंकडे अंधार पसरला. डॉक्टर मोठ्या मुष्किलीनें फाटकापाशीं पोंचला आणि गाडी शोधण्या-साठीं त्याला तब्बल दीड तास शोध करावा लागला.

" मी कमालीचा थकलों आहे - घरीं चल ! - " डॉक्टरनें आपल्या गाडीवानाला आज्ञा केली. गाडींत आरामानें बसल्यानंतर तो स्वतःशींच म्हणाला- " आपण फार लठ्ठ होत चाललों आहोंत – हें बरें नव्हे ! - "

## : ३ :

दुसरे दिवशीं संध्याकाळीं डॉक्टर पुन्हां टर्किन कुटुंबाकडे गेला. परंतु तेव्हांहि त्याला संधि मिळाली नाहीं; कारण येकातेरिना आंत कपडे करीत होती - त्या संध्याकाळीं तिला एका नृत्यांत भाग घ्यायचा होता.

डॉक्टर दिवाणखान्यांत चहा घेत बसला होता तो थोडासा खिन्न दिसत होता – त्याची खिन्नता घाल-विण्यासाठीं पेट्रोव्हिच् त्याला एक पत्र वाचून दाखवीत होता.

" यांच्याकडून आपल्याला चांगला हुंडा उकळतां येईल " – अशा प्रकारचा एक अस्पष्ट विचार डॉक्टर-च्या डोक्यांत घोळत होता.

आदल्या दिवशीं सबंध रात्रभर तो तळमळत पडला होता– त्याच्या हृदयांत आनंदाची एक ऊर्मि उसळत होती. त्याची वृत्ति स्वप्नाळू बनली होती – पण डोक्यांतमात्र थंडपणें एक विचार उसळत होता –

' झालं तें पुरें झालं– ती तुझ्यासाठीं अनुरूप तरी आहे काय ? – ती वयानें कितीतरी लहान आहे– तूं प्रौढ आहेस – डॉक्टर आहेस– '

' मग त्यांत कुठें बिघडलं ? " – त्यानें स्वतः-लाच प्रश्न केला.

' तिच्याशीं लग्न केल्यानंतर शहरांत राहावें लागेल – तिथली नोकरी सोडावी लागेल ' –

' त्यांत काय हरकत आहे ? मी शहरांत राहीन – हुंडा मिळेल त्यांतून शहरांत स्थायिक होणें अवघड नाहीं ' –

येकातेरिना इव्हानोव्हना खोलींत आली. ती रस-रशीत दिसत होती. डॉक्टरला तिच्याशीं काय बोलावें हें सुचत नव्हतें. तो तिच्याकडे नुसता बघतच राहिला.

सर्वांचा निरोप घेऊन ती निघाली आणि मग डॉक्टरहि रोग्यांची प्रकृति बघावयाची आहे हें कारण सांगून तिथून निघाला.

" हें कांहीं बरें नव्हे डॉक्टर ! एवढ्यांतच निघा-लांत ? – जातच आहां तर पोरीलाहि वाटेंत सोडा ना " – पेट्रोव्हिच् म्हणाला.

बाहेर काळोख होता. गाडीवानाच्या आवाजाच्या अनुरोधानें ते गाडीजवळ पोचले. मुलीला गाडींत बसल्यानंतर पेट्रोव्हिच् हात हालवीत म्हणाला – " बराय् ! – " गाडी चालूं लागली.

" मी काल स्मशानांत गेलों होतों-तुम्हीमात्र आलां नाहीं ! " – डॉक्टरनें बोलण्यास प्रारंभ केला.

"म्हणजे ! तुम्ही खरंच स्मशानांत गेलां होतां !–" ती आश्चर्यानें म्हणाली.

" मी दोनतास तुमची वाट बघत होतों–भलताच त्रास झाला ! – " डॉक्टर तक्रारीच्या स्वरांत म्हणाला.

"तुम्हाला थट्टादेखील समजत नाहीं म्हणायची!–"

डॉक्टरला आपण कसें बनवलें याचा तिला मोठा आनंद झाला. ती हंसत होती एवढयांतच गाडी एकदम क्लबकडे वळल्यामुळें ती डॉक्टरच्या अंगावर

कोसळली. डॉक्टरनें आपला हात तिच्याभोंवतीं लपेटला. ती त्याला रेलून बसली – त्यानें तिला आपल्या मिठींत घट्ट पकडलें आणि तिच्यावर चुंबनांचा वर्षाव करण्यास प्रारंभ केला.

" झालं समाधान ? – " त्याच्यापासून सुटका करून घेत तिनें थंडपणानें विचारलें. दुसऱ्याच क्षणीं ती गाडींतून अदृश्य झाली. वाहनांना दिशा दाखविणारा पोलीस थांबलेल्या गाडीवानाला ओरडून म्हणाला – " गाडी कां थांबवली आहे ? – चालायला लागा ! – "

डॉक्टर घरीं जाऊन कपडे बदलून परत क्लबमध्यें आला. रात्रीं खूप उशिरापर्यंत तो क्लबमध्यें बसून राहिला. येकातेरिना त्याच्याजवळच बसली होती. तो तिला सांगूं लागला – " खरेंच ! प्रेमाची गोडी कांहीं निराळीच असते ! मला असें वाटायला लागलें आहे कीं प्रेमाचें वर्णन अद्यापपावेतों कुणालाच करतां आलें नाहीं ! ही गोष्टच मोठी कठीण आहे – ती अनुभवल्याखेरीज कळूंच शकत नाहीं – माझें प्रेम आहे तुझ्यावर " – डॉक्टर भावविवश होऊन बोलत होता. तिचा हात पकडून त्यानें विचारलें – " माझ्याशीं लग्न करशील ? – "

" डॉक्टर योनिच् साहेब ! तुमच्या या मागणीबद्दल मी तुमची आभारी आहे ! " – ती गंभीरपणानें म्हणाली आणि उठून उभी राहिली – उभ्या उभ्याच पुढें म्हणाली – " पण मला क्षमा करा ! मी तुमच्याशीं लग्न करूं शकत नाहीं ! मी कलेवर किती प्रेम करतें – संगीताची मला किती आवड आहे हें तुम्हाला माहीतच आहे. एक उत्तम गायिका होण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे. मला कीर्ति, यश आणि स्वातंत्र्य हवें आहे – तुम्ही मला याच शहरांत राहण्याचा उपदेश करीत आहांत – मला इथल्या जीवनाचा कंटाळा आला आहे – त्यांत आणखी लग्न झालं म्हणजे आटोपलंच ! तें शक्य नाहीं. प्रत्येक माणसानें आपलें ध्येय निश्चित केलें पाहिजे – कौटुंबिक पाशामुळें विकास थांबतो – बंधनें पडतात – " तिचा चेहरा खिन्न दिसत होता आणि अश्रूंच्या सरी गालावरून ओघळत होत्या – आवंढा गिळून ती पुढें म्हणाली – " डॉक्टर ! तुम्ही विद्वान् आहांत – प्रेमळ स्वभावाचे आहांत – तुमच्याबद्दल मला आदर आहे – जिव्हाळा आहे – पण – पण मला तुमची मागणी पूर्ण करतां येत नाहीं – "

ती अगदीं रडायच्या बेतांत होती. ती उठून ताबडतोब बाहेर निघून गेली.

डॉक्टरच्या मनावरील दडपण आतां कमी झालें होतें. बाहेर रस्त्यावर आल्याबरोबर त्यानें नेकटाय ओढून काढला आणि एक दीर्घ श्वास घेतला. एखाद्या मामुली दर्जाच्या कॉमेडीसारखा आपल्या या प्रकरणाचा शेवट होईल असें त्याला वाटलें नव्हतें. हा चमत्कारिक नकार त्याला मिळाला होता – त्याला स्वतःच्या भावनांबद्दल वाईट वाटत होतें. त्याला कसेंतरी गुदमरल्यासारखें वाटत होतें.

सतत तीन दिवस त्याला झोंप आली नाहीं. तो वेळेवर जेवला नाहीं. एके दिवशीं येकातेरिना इव्हानोव्हना मॉस्कोला संगीताचें शिक्षण घेण्यासाठीं निघून गेली आहे ही बातमी त्याच्या कानावर पडली आणि मग तो शांत झाला – पूर्वीप्रमाणें राहूं लागला.

नंतर जेव्हां जेव्हां त्याला तो स्मशानांतला प्रसंग आठवे – किंवा त्या दिवशीं तो तिच्यासाठीं कसा वणवण भटकला होता – याची आठवण येई – तेव्हां तो आळसटलेल्या स्वरानें स्वतःशींच म्हणे :

" काय करावें – कांहीं सुचतच नव्हतें ! – "

## : ४ :

या गोष्टीला चार वर्षें लोटलीं. डॉक्टरचा एव्हांना तिथें चांगला जम बसला होता. शहरांतदेखील त्याचे पुष्कळ रोगी होते आणि त्यांना बघण्यासाठीं दररोज सकाळीं तो जात असे. तो आतां चांगलाच लठ्ठ बनला होता आणि पायीं चालण्याचे श्रम त्याला अजिबात सोसवत नव्हते.

डॉक्टरचा धंद्याच्या निमित्तानें अनेक लोकांशीं संबंध आला होता परंतु तो कुणाशींच सलगीनें वागत नसे. त्यांना बोलण्याचा, त्यांना भेटण्याचादेखील डॉक्टरला मनस्वी त्रास होत असे. एखाद्या माणसाबरोबर पत्ते खेळण्याला त्याचा विरोध नव्हता पण जर का तो माणूस कुठल्या विषयावर बोलायला लागला म्हणजेमात्र डॉक्टरला त्याची चीड यायची ! डॉक्टर मग त्याला स्वतःचें विक्षिप्त तत्त्वज्ञान सुनवायचा. डॉक्टरचीं कुठल्याहि विषयावरील मतें अशीं कांहीं विलक्षण असत कीं त्याच्याशीं बोलणें देखील कठीण

होतें. तो एखाद्या वेळीं बोलण्याच्या ओघांत सहजच म्हणायचा. ' आजकाल मानवता प्रगतिपथावर चालली आहे ' – त्याच्या या साध्या विधानाकडेसुद्धां माणसें साशंक नजरेनें बघत. कुणीतरी भीत भीत म्हणे – ' तुम्हाला असं तर म्हणायचं नाहीं ना कीं माणसें आजकाल एकमेकाचे गळे कापीत आहेत ! ' –

या माणसांबरोबर बोलण्याचीदेखील पंचाईत होती. डॉक्टर म्हणूनच त्यांच्याबरोबर बोलण्याचें शक्यतों टाळीत होता. या लोकांबरोबर पत्ते खेळणें, जेवणें, एखाद्या समारंभांत भाग घेणें – या गोष्टीमात्र तो करीत होता. समारंभांतील शिष्टाचार आणि औपचारिक प्रकार त्याला मुळींच पसंत नव्हते. या सर्व गोष्टी त्याच्यामतें मूर्खपणाच्या आणि फाजिल होत्या. केव्हां केव्हां हें सर्व सांगण्याचा त्याला मोह होई पण परत तो आपल्या जिभेला लगाम घाली – तो अगदीं गप्प बसायचा – लोकमात्र त्याच्या या अबोलपणाचीहि टर उडवत होते –

डॉक्टर थिएटरकडे कधींच फिरकत नसे. तीन तीन तास तो जुगार खेळण्यांत घालवायचा – यांत त्याला बरीच प्राप्तिहि होत असे. नोटांचीं पुडकींच्या पुडकीं त्याच्या खिशांत जमायचीं आणि मग तो सारे पैसे सहकारी-कर्ज-बँकेंत जमा करायचा.

गेलीं चार वर्षें डॉक्टरचा हाच कार्यक्रम अविरत-पणें चालला होता. एके दिवशीं वेरा योसिफोनाचें त्याला एक पत्र आलें. तिच्या वाढ-दिवसाचें तें आमंत्रण होतें. त्या पत्राच्याखालीं एक ताजा कलम होता – " आईच्या विनंतींत मी सुद्धां सहभागीं आहे "– ता. क. येकातेरिनानें लिहिला होता.

त्या संध्याकाळीं डॉक्टर त्यांच्या घरीं गेला. योसिफोना आतां चांगलीच वृद्ध दिसत होती. डॉक्टरचा हात पकडून ती प्रेमानें म्हणाली – " डॉक्टर ! आजकाल तुम्ही आमच्याकडे दुर्लक्ष करीत आहांत ! तुम्हाला माझ्या प्रकृतीची काळजीच राहिली नाहीं. आणि हो ! किट्टन नेहमी तुमची वाट बघत असते !– "

येकातेरिना कोमेजल्यासारखी दिसत होती–पण तिचा आकर्षकपणा अजून कायम होता. तिच्या चेहऱ्यावरील निष्पापपणा आतां नाहींसा झाला होता–तिच्या डोळयांत अपराधाची छटा तरळत होती. ती कमालीची दुःखी दिसत होती.

"आपल्या भेटीला किती तरी वर्षें झालीं–नाहीं ?-" ती म्हणाली. तिची छाती धडधडत होती–त्याच्याकडे एकटक बघत ती परत बोलूं लागली– " तुम्ही आतां चांगलेच लठ्ठ झालांत डॉक्टर ! किती प्रौढ दिसायला लागलांत ? – पण तसा विशेष बदल झाला नाहीं म्हणा ! "—

ती आकर्षक दिसत होती पण तिच्यांत कांहीं तरी बदल झाला होता. पूर्वी नसलेलें असें कांहीं तरी तिच्यामध्यें दिसत होतें. तिच्याबद्दल डॉक्टरला पूर्वी सारखें वाटत नव्हतें. एवढेंमात्र खरें ! तिचा निस्तेज, फिकट चेहरा, तिचें हें नवें रूप डॉक्टरला मुळींच पसंत नव्हतें. तिचें हास्य कृत्रिम होतें–तिचा आवाज बदलला होता–तिची वेषभूषादेखील डॉक्टरला आवडत नव्हती. ती ज्या खुर्चीवर बसली होती ती खुर्चीदेखील डॉक्टरच्या तिरस्काराचा विषय बनली होती. डॉक्टरला पूर्वीचें सारें आठवलें - तें प्रेम आठवलें - तीं स्वप्नें आठवलीं - आणि त्याला स्वतःचीच लाज वाटली - क्षुद्रपणाची. आंधळेपणाची !

चहा - फराळानंतर योसिफोना आपली कादंबरी वाचून दाखवायला लागली. जीवनांत कधींच न घडलेल्या गोष्टी तिच्या कादंबरींत होत्या. डॉक्टर शांतपणें ऐकत होता आणि कादंबरी संपण्याची वाट बघत होता. यानंतर येकातेरिनानें पियानो वाजवला आणि सर्वांनीं टाळया पिटून तिचे आभार मानले. " आपण हिच्याशीं लग्न केलें नाहीं - ही फार चांगली गोष्ट केली ! - " डॉक्टरांच्या मनांत विचार आला.

तो आतां बागेंत बोलावील अशी तिची अपेक्षा होती– पण तो कांहींच बोलला नाहीं.

शेवटीं तीच त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली - " कसं काय चाललंय् डॉक्टर ? - काय म्हणतें जीवन ? - एवढे दिवस मी तुमच्यासंबंधींच विचार करीत होतें बरें का ! - " तिचा चेहरा जास्तच खिन्न दिसूं लागला. " तुम्हाला पत्र पाठवण्याची माझी अत्यंत इच्छा होती - बरें कां डॉक्टर ? तुम्हाला भेटावें असेंहि अनेकवेळां मनांत आलें - तसें मी ठरवलेंहि होतें - पण तो विचार मी बदलला. तुम्हाला माझ्यासंबंधीं काय वाटलें असतें कुणास ठाऊक ? - आजमात्र मी तुमची एकसारखी वाट बघत होतें - चला ना - आपण बागेंत जाऊं या ! - "



अनुक्रमणिका






डॉक्टर कांहींच बोलला नाहीं. तिच्याबरोबर मुकाट्यानें तो बागेंत आला. भोंवतीं काळोख पसरला होता.

" कसं काय चाललंयू आजकाल ? -" तिनें पुन्हां तोच प्रश्न विचारला.

" अगदीं मजेंत आहें "– डॉक्टरनें उत्तर दिलें. त्याला दुसरें कांहीं सुचतच नव्हतें - दोघेंहि गप्प होतीं.

मला अगदीं कंटाळा आला होता मॉस्कोचा – केव्हां एकदां आपल्या माणसांत येईन असें झालें होतें - सतत इथल्या आठवणी यायच्या – आपण रात्र रात्र बोलत बसूं असें मी ठरवलें आहे ! -" ती चेहऱ्यावरून हात फिरवीत म्हणाली.

तो तिच्याकडे बघत होता. आतां ती त्याला जास्त तरूण वाटत होती – तिचा चेहरा पूर्वीसारखाच निष्पाप दिसत आहे असें त्याला वाटलें. ती त्याच्याकडे आतुरतेनें बघत होती – एकेकाळच्या त्या प्रेमाच्या खुणा तिच्या डोळ्यांत दिसत होत्या. स्मशानांतलें तें वाट बघणें, तिच्यासाठीं वेड्यासारखें भटकणें हें सारें त्याला आठवलें – आणि त्या हरवलेल्या भूतकाळाबद्दल त्याला वाईट वाटत होतें. " आपण दोघें त्या रात्रीं क्लबमध्यें गेलों होतों - ती रात्र आठवते ? बाहेर पाऊस कोसळत होता - भोंवतीं सारा काळोख होता -" त्याच्या आत्म्यांत ज्योत तेवत असल्याचा त्याला भास झाला. त्याचें अंतरंग प्रकाशानें भरून गेलें. तिच्याबरोबर बोलत बसावें असें त्याला वाटलें.

" काय विचित्र आहें मी ! तुम्ही माझ्या जीवनासंबंधीं विचारत होतां नाहीं का ? - आपण दोघेंहि आतां प्रौढ झालों आहोंत - शरीर लठ्ठ बनलें आहे - दिवसामागून दिवस जात आहेत - नवीन असें कांहींच घडलें नाहीं - नवे विचारदेखील सुचत नाहींत - पैसे कमावण्यांत सारें आयुष्य जात आहे - संध्याकाळ क्लबमध्यें घालवतों पत्ते खेळण्यांत - पिण्यांत - गप्पा मारण्यांत - कंटाळा आला आहे या असल्या जगण्याचा ! - "

" डॉक्टर ! तुम्हाला काम तरी आहे भरपूर - तुम्ही ध्येयवादी आहांत - मागें तुम्ही या व्यवसायासंबंधीं पुष्कळच सांगत होता - मी मोठी मूर्ख होतें तेव्हां ! उत्तम गायिका होण्याची माझी महत्त्वाकांक्षा होती - प्रत्येक मुलगीच आजकाल गाते - पियानो वाजवते – मीहि त्यांच्यापैकींच एक आहें - स्वतःसंबंधीं उगीचच भ्रम होता मला ! मी मुळींच निराळी नाहीं त्यांच्याहून ! माझी आई जशी लेखिका आहे - तशीच मी पियानो वाजवणारी आहें - मला तेव्हां तुमची ओळखच पटली नव्हती - पण मॉस्कोला गेल्यानंतर मी नेहमी तुमच्यासंबंधींच विचार करीत असें - तुमच्याखेरीज मला दुसरें कांहीं सुचतच नसे. खरेंच ! डॉक्टर होण्यांत केवढें सुख आहे ! पीडितांना साहाय्य करतां येतें - लोकांची सेवा करतां येते - किती समाधान मिळत असेल या गोष्टीचें तुम्हाला ? - " येकातेरिना उल्हसित होऊन वारंवार याच गोष्टीवर बोलत होती.

डॉक्टरला आपल्या मिळकतीची आठवण झाली. तो ज्या आत्मविश्वासानें संपत्ति मिळवीत होता ती गोष्ट त्याला आठवली. संपत्तीच्या आठवणीनें मग त्याच्या आत्म्यांत प्रज्ज्वलित झालेली ज्योत एकदमच विझली.

तो ताडकन् घरीं जाण्यासाठीं निघाला. ती त्याचा हात पकडून म्हणूं लागली – " तुम्ही फार श्रेष्ठ आहांत डॉक्टर ! आपण दररोज एकमेकांला भेटायचें ना ? उद्यां परत भेटणार म्हणून वचन द्या ! मी पियानो अजिबात वाजवायची नाहीं – स्वतःविषयीं मला कुठलेच भ्रम राहिले नाहींत – यापुढें मी कधींच कलेचा किंवा संगीताचा विषय काढायची नाहीं –" ती घाईघाईनें सांगत होती.

दोघेहि आंत आल्यानंतर प्रकाशांत जेव्हां डॉक्टरनें तिच्याकडे बघितलें तेव्हां तिचा चेहरा पश्चात्तापदग्ध आणि खिन्न दिसत होता. पुन्हां एकदां त्याच्या मनांत विचार आला–" बरं झालं ! आपलें हिच्याबरोबर लग्न झालें नाहीं तें ! –"

निरोप घेऊन तो निघायला लागला तेव्हां पेट्रोव्हिच् म्हणाला – जेवल्याखेरीज आम्ही तुम्हाला मुळींच जाऊं देणार नाहीं डॉक्टर ! –"

परंतु डॉक्टर थांबला नाहीं. आतां या सर्वच गोष्टींचा त्याला त्रास होत होता. गाडींत बसल्यानंतर अंधारांत बुडालेल्या त्या घराकडे तो बघत होता – एके काळीं या घरांतली प्रत्येक वस्तु त्याला प्रिय होती – योसिफोनाच्या कादंबऱ्या-येकातेरिनाचें पियानो-वादन – पेट्रोव्हिच्च्या विनोदी गोष्टी–पण आतां हें सारें नकोनकोसें वाटत होतें–तो त्यांच्यापासून दूर पळत होता–

तीन दिवसांनंतर येकातेरिनानें गड्याबरोबर डॉक्टरला एक पत्र पाठवलें. तिनें पत्रांत लिहिलें होतें–








"तुम्ही आमच्याकडे येण्याचें हल्लीं टाळीत आहांत — तुमची वागणूक बदलत चालली आहे कीं काय अशी मला शंका येते — मला खूप भीति वाटायला लागली आहे — आज येऊन माझें समाधान कराल काय ? त्याखेरीज मला मुळींच बरें वाटणार नाहीं.

तुमच्या भेटीसाठीं आतुर असलेली
तुमची —
येकातेरिना.

डॉक्टरनें पत्र वाचून क्षणभर विचार केला आणि नंतर तो गड्याला म्हणाला "हें बघ ! तिला सांग— आज मीं येऊं शकत नाहीं-भरपूर काम आहे आज— एकदोन दिवसांनंतर येईन म्हणावें —"

तीन दिवस होऊन गेले-एक आठवडा लोटला आणि तरीहि डॉक्टर तिला भेटायला गेला नाहीं. एकदां तो तिच्या घरावरून जात होता तेव्हां क्षणभर त्याला आंत जाऊन यावें असें वाटलें. त्यांची भेट घ्यावी अशी त्याची इच्छा होती — पण ती इच्छा जागच्या जागींच राहिली. तो तसाच गाडींत बसून तिथून निघून गेला.

डॉक्टर पुन्हां कधींच टर्किन कुटुंबाकडे फिरकला नाहीं . . .

## : ५ :

. . . या गोष्टीला आतां अनेक वर्षे लोटलीं आहेत. डॉक्टर आतां चांगला गलेलठ्ठ झाला आहे-त्याला सरळ मान ठेवून चालणें सुद्धां मुष्किल झालें आहे. त्याची प्रॅक्टिस एवढी वाढली आहे कीं त्याला श्वासोच्छ्वास घ्यायला देखील सवड मिळत नाहीं. त्यानें शहरांत दोन घरें घेतलीं आहेत. जवळच्या खेड्यांतहि त्यानें इस्टेट केली आहे.

घरें खरेदी करण्याचें त्याला व्यसनच लागल्याप्रमाणें झालें आहे. कुठल्याहि घराचा लिलांव होणार असें ऐकलें म्हणजे तो मोठ्या उत्साहानें त्या घराची पाहणी करतो. प्रत्येक खोलींत फिरतो-भोंवतालच्या अर्धनग्न स्त्रिया, मुलांचा गोंधळ याकडे त्याचें लक्ष नसतें. तो खोलीच्या प्रत्येक दारावर काठी ठोठावतो "ही अभ्यासाची खोली आहे वाटतें ? आणि ही झोंपण्याची ? ती खोली कशाची आहे बुवा ?"—

एवढें बोललें म्हणजे त्याला धाप लागते. तो घामानें डबडबतो. चरबीमुळें त्याचा गळा लठ्ठ झाला आहे यामुळें त्याचा आवाज देखील बदलला आहे.

तो आतां पूर्वीप्रमाणें लोकप्रिय राहिला नाहीं. रोग्यांची प्रकृति तपासतांना तो सारखा त्यांच्यावर खेंकसत असतो — चिडत असतो. रागावला म्हणजे तो आपली काठी जमिनीवर आपटतो. तो त्यांना एकसारखा दरडावीत असतो — "फालतू बोलूं नका ! मी विचारतों त्या प्रश्नांचीं उत्तरें द्या नीट ! — "

तो एकटाच राहतो — त्याचें जीवन अगदींच नीरस बनलें आहे. कशांतच त्याला गोडी वाटत नाहीं. येकातेरिनावरील त्याचें प्रेम हीच त्याच्या आयुष्यांतील एकुलती एक आनंदाची गोष्ट आहे. तो क्लबांत पत्ते खेळतो आणि मोठ्या टेबलापाशीं एकटाच जेवण घेतो क्लबमधला सर्वांत जुना नोकर इव्हान त्याचे हुकूम पाळतो. त्याच्या आवडी-निवडी तिथल्या मॅनेजरपासून ते नोकरापर्यंत सर्वांच्या परिचयाच्या झाल्या आहेत. त्या पुरविण्यासाठीं सर्वांची धडपड चालते. थोडेसेंहि बिघडलें तर तो भयंकर संतापतो आणि संतापानें थरथर आपली काठी जमिनीवर आपटायला सुरुवात करतो. जेवतांना तो क्वचितच संभाषणांत भाग घेतो. शेजारच्या टेबलाजवळचीं माणसें यदाकदाचित् जर टर्किन कुटुंबासंबंधीं बोलत असतील तर तो आगंतुकासारखा विचारतो — "कसं काय चाललय् टर्किन कुटुंबाचं ? अहो ! मिस्टर ! — काय म्हणते त्यांची पियानो वाजवणारी मुलगी ?" तो जास्त कांहींच विचारीत नाहीं.

डॉ. योनिच्संबंधीं सांगावयाचें तें एवढेंच आहे.

आणि टर्किन कुटुंब ? पेट्रोव्हिच्च्या वयांत तसा कुठलाच बदल जाणवत नाहीं. तो आपले ठराविक विनोद करतो आणि उथळ गोष्टी सांगतो — वेरा योसिफोना आल्या-गेल्या पाहुण्यांना आपल्या कादंबऱ्या वाचून दाखवीत असते आणि येकातेरिना इव्हानोव्हना दररोज चार तास पियानोवर मेहनत करते. ती आतां चांगलीच प्रौढ झाली आहे — ती नेहमी आजारी असते आणि शिशिरऋतु आला म्हणजे ती आपल्या आईबरोबर थिएटरला जाते. पेट्रोव्हिच् त्यांना गाडींत बसवतो आणि गाडी सुटली म्हणजे आपले भरलेले डोळे पुशीत तो निरोप देतो — "गुड बाय ऽऽ" —

आणि गाडी दूर दूर जाईपर्यंत तो आपला हातरुमाल फडकावीत प्लॅटफॉर्मवर उभा राहतो.



अनुक्रमणिका






# अँटन पी. चेकॉव्ह ( जीवनपरिचय )

रशियाचा सुप्रसिद्ध लघुकथालेखक व नाटककार अँटन पी. चेकॉव्ह याचें निधन होऊन २ जुलै १९५६ रोजीं बावन वर्षें पुरीं होत आहेत.

अँटन पी. चेकॉव्ह या रशियन लघुकथाकाराचा जन्म टॅगॅन्‌रॉग–बंदरांत १७ जानेवारी १८६० रोजीं झाला. त्याचा बाप व्यापारी होता आणि त्याच्या कडक शिस्तींत चेकॉव्हचा बाळपणाचा काळ गेला. चेकॉव्हचें वय सोळा वर्षांचें होतें तेव्हां त्याच्या बापाचें व्यापारांत दिवाळें वाजलें आणि कर्जबाजारीपणामुळें त्याचा बाप मॉस्कोला पळून गेला. घरचीं माणसें हळुहळू मॉस्कोला गेलीं परंतु चेकॉव्ह मात्र आपल्या एका नातेवाईकाकडे राहून शिक्षण घेत होता. त्याचा स्वभाव मोठा विनोदी होता. कुटुंबाच्या हलाखीच्या परिस्थितीमुळें त्याच्यावर दडपण होतें तें पुढें राहिलें नाहीं. म्युनिसिपालिटीकडून त्याला वेतन मिळत होतें. त्या प्राप्तींतून तो कॉलेजांत डॉक्टरीचा अभ्यास करीत होता.

डॉक्टरीची पदवी घेऊन त्यानें व्यवसायाला प्रारंभ केला, परंतु आर्थिक दृष्ट्या या व्यवसायांत तो कधींच यशस्वी झाला नाहीं. त्याच्याकडे बहुधा दरिद्री रोगी येत आणि तो त्यांना मोफत इलाज करी. यामुळें पैसे मिळविण्यासाठीं त्याला लेखनावर अवलंबून राहावें लागलें. डॉक्टरीनें त्याला पैसा मिळाला नाहीं. परंतु एक नवीन दृष्टि मात्र प्राप्त झाली. मानवी स्वभावाचे विविध नमुने त्याला या व्यवसायामुळें बघावयास मिळाले. जीवनाच्या प्रवाहांत असंख्य दुःखें उराशीं कवटाळून जगणाऱ्या या माणसांबद्दल चेकॉव्हला अपार सहानुभूति होती.

पैसा मिळविण्यासाठीं म्हणून त्यानें याच काळांत एका विनोदी साप्ताहिकांतून लेखनास प्रारंभ केला. जाहिरातीपासून रहस्यकथेपर्यंत त्यानें विविध वाङ्मय-प्रकार हाताळले. सुरुवातीच्या या लिखाणाविषयीं त्याचें स्वतःचेंच चांगलें मत नव्हतें.

१८८६ मध्यें तो पिटर्सबर्गला गेला. या काळांत त्याचें लिखाण लोकप्रिय झालें होतें. पिटर्सबर्गला त्याचें भव्य स्वागत झालें होतें. आतांपावेतों त्याचे दोन कथासंग्रह प्रसिद्ध झाले होते. १८८७ मध्यें त्यानें 'इव्हानॉव्ह' हें नाटक लिहिलें पण तें पडलें. पुन्हां दोन वर्षांनंतर त्यानें हेंच नाटक परत एकदां लिहिलें आणि मग मात्र तें चांगलें गाजलें.

'द वुड डेमन', 'द सी-गल', 'द थ्री सिस्टर्स', 'द चेरी ऑर्चर्ड' इत्यादि नाटकें त्यानें झपाट्यानें लिहिलीं. मोपॉसाच्या तोडीचा कथालेखक म्हणून जसा तो गाजला तसाच एक श्रेष्ठ नाटककार म्हणूनहि तो नांवाजला. 'द सी-गल' या त्याच्या नाटकांत इरिनाची भूमिका करणाऱ्या ओल्गा निपरशीं त्याची १९०१ मध्यें ओळख झाली आणि त्याचवर्षी त्यानें तिच्याशीं लग्न केलें.

लग्नाच्या एक वर्ष अगोदरच त्याला 'नॅशनल ॲकॅडमी ऑफ सायन्सेस' या संस्थेच्या ललित वाङ्मय विभागाचें सभासदत्व मिळालें होतें. टॉलस्टॉयच्या नंतर सबंध रशियाभर त्याचेंच नांव घेतलें जात होतें. प्रारंभीं टॉलस्टॉयच्या विचारांचा त्याच्यावर अत्यंत प्रभाव होता–पण तो पुढें नाहींसा झाला. चेकॉव्हचा प्रत्यक्ष राजकारणाशीं संबंध नव्हता. हुकूमशाहीचा त्याला तिरस्कार होता. रशियामध्यें क्रांति होणें अशक्य आहे असें त्याचें प्रारंभीं मत होतें. पण पुढें तें बदललें.

१८८८ मध्यें त्याला **पुश्किन पारितोषिक** मिळालें. यामुळें त्याला आर्थिक स्थैर्य प्राप्त झालें. चेकॉव्हनें फ्रान्स, इटली इत्यादि देशांचा प्रवास केला होता. राजकीय आणि सामाजिक तत्त्वज्ञानाचा त्याचा प्रत्यक्ष व्यासंग नसला तरी तो या गोष्टीं विषयीं चांगलाच जागरूक होता. दुष्काळी परिस्थितींत, कॉलऱ्याच्या साथींत तो नेहमी आघाडीवर असे.

१८९७ मध्यें त्याची प्रकृति अत्यंत ढासळली. वैद्यकीय तपासणी केल्यानंतर त्याला क्षय झाला आहे असें आढळून आलें.

त्याचें समग्र वाङ्मय दहा खंडांतून प्रसिद्ध झालें आणि त्याला बराच पैसाहि मिळाला. १९०४ मध्यें त्याला ४४ वर्षें पुरीं झाल्याबद्दल समारंभ साजरा करण्यांत आला. हें वर्ष त्याच्या लिखाणाचें रौप्यमहोत्सवी वर्ष म्हणून त्याच्या मित्रांनीं साजरें केलें. या समारंभांत त्याला भाषण देखील करतां आलें नाहीं. त्याला उभें राहणें सुद्धां कठीण होतें. क्षयरोग शेवटच्या पायरीवर पोंचल्यामुळें त्याला बेडनवायलर येथें एका हॉस्पिटलांत नेण्यांत आलें. तिथेंच २ जुलै १९०४ ला त्याचें प्राणोत्क्रमण झालें. त्याचा देह तेथून मॉस्कोला नेण्यांत आला. (संकलित)

—तु. शं. कुलकर्णी











अनुक्रमणिका

श्री. व. भ. कर्णिक

# रशियामधील अलीकडील घडामोडी

रशियामध्यें अलीकडे कांहीं आश्चर्यजनक घडामोडी घडून आल्या आहेत. त्या घडामोडींबद्दल बरीचशी माहिती वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली आहे. त्यामुळें त्या घटनांच्या सत्यतेबद्दल आतां कुणालाहि शंका घेतां येणार नाहीं. परंतु घटना घडल्या हें जरी मान्य झालें तरी त्यांचा अर्थ काय याविषयींमात्र अद्याप पुष्कळ मतभेद आहेत.

## स्टॅलिनविरुद्ध मोहीम

सर्वांत आश्चर्यजनक आणि अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे स्टॅलिनविरुद्ध सुरू झालेली मोहीम. ज्या स्टॅलिनला जवळजवळ पंचवीस वर्षें देव म्हणून डोक्यावर नाचवलें व ज्या स्टॅलिनच्या लहरीप्रमाणें एक पाव शतकभर देशाचा सारा कारभार चालला त्या स्टॅलिनला देव्हाऱ्यांतूनच नव्हे तर देवघरांतूनहि आतां बाहेर फेंकून देण्यांत आलें आहे. स्टॅलिनवर त्याच्या विरोधकांनीं व टीकाकारांनीं आजवर जे जे आरोप केले ते सारे खरे होते अशीच कबुली पर्यायानें आजच्या रशियाच्या नेत्यांनीं दिली आहे.

स्टॅलिनची राजवट जुलमी होती, त्यानें हजारों निरपराध लोकांचे केवळ संशयावरुन प्राण घेतले, विरोधकांच्या विरुद्ध खोटे पुरावे तयार केले, जनतेला दहशतींत ठेवलें, तिच्या हिताची पायमल्ली केली, स्वतःचें वैयक्तिक पुढारीपण प्रस्थापित केलें आणि खोटानाटा इतिहास रचून स्वतःचें स्तोम माजविलें– अशी त्याच्या संबंधीची खरी हकिकत आतां ख्रुश्चेव्हनें सांगितली आहे. ख्रुचेव्हच्या कम्युनिस्ट पक्षाच्या विसाव्या परिषदेपुढील त्या भाषणाचा गोषवारा अमेरिकन सरकारनें नुकताच प्रसिद्ध केला. तो गोषवारा अधिकृत नसला तरी खरा आहे अशी कबूली अमेरिकन कम्युनिस्ट पक्षाचें मुखपत्र जें " डेली वर्कर " त्यानें दिली आहे.

स्टॅलिनविरुद्ध सुरू झालेल्या या मोहीमेचें कुणीहि स्वागतच करील. कारण कुणाहि व्यक्तीचें खरें स्वरूप, तिच्या मृत्यूनंतरहि कां होईना, स्पष्ट होणें अत्यंत अगत्याचें असतें. आणि स्टॅलिन ही इतकी अघोरी व्यक्ति होती आणि तिच्याविषयीं इतक्या खोट्यानाट्या दंतकथा प्रचलित करण्यांत आलेल्या होत्या कीं, जगाला तिचें खरें स्वरूप समजणें अत्यंत आवश्यक होतें. स्टॅलिनचे एके काळचे भक्त आणि विश्वासू सहकारीच तें काम करीत आहेत ही त्यांतल्यात्यांत आनंदाची गोष्ट आहे.

स्टॅलिनचीं बरीचशीं धोरणें आणि निदानें चुकीचीं होतीं आणि विशेषेंकरून एखाद्या व्यक्तीचें स्तोम माजवून त्या व्यक्तीचें पुढारीपण प्रस्थापित करण्याची त्याची पद्धत ( cult of the personality ) घातुक होती, असें रशियाच्या आजच्या राज्यकर्त्यांनीं जाहीर केलें आहे. स्टॅलिनच्या चुकीच्या धोरणामुळें आंतरराष्ट्रीय राजकारणांत तेढ माजली, युगोस्लाव्हियासारखे मित्र दुरावले व भांडवलशाही राष्ट्रांची एकजूट जास्त मजबूत झाली. भांडवलदारी राष्ट्रांतील उत्पादनाला उतरती कळा लागली आहे हें स्टॅलिनचें निदान चुकीचें होतें तसेंच स्वतःचें त्यानें जें स्तोम माजवलें आणि अनिर्बंध असें जें पुढारीपण स्थापन केलें त्यामुळें पक्षांतील लोकशाही नष्ट झाली, देशामध्यें भीतीचें आणि संशयाचें वातावरण पसरलें आणि जनतेचा नाहक छळ झाला. या व अशाच तऱ्हेच्या अनेक गोष्टी ख्रुचेव्ह, मिकोयान वगैरे पुढाऱ्यांनीं फेब्रुआरीमध्यें भरलेल्या कम्युनिस्ट पक्षाच्या विसाव्या परिषदेंत सांगितल्या आणि आपल्या नवीन धोरणाला पक्षाच्या संमतीचें शिक्कामोर्तब मिळविलें.

ख्रुचेव्ह–आदिकरून रशियाचे राज्यकर्ते आपलें नवीन धोरण हें खरेंखुरें लेनिनवादी धोरण आहे अशी ग्वाही देतात. म्हणजे स्टॅलिनचा जरी त्यांनी धिक्कार केलेला असला तरी लेनिन आणि मार्क्स यांना त्यांनीं सोडलेलें नाहीं. स्टॅलिननें लेनिनच्या शिकवणुकीकडे दुर्लक्ष केलें, लेनिनच्या मार्गाशीं त्यानें प्रतारणा केली असा त्यांचा त्याच्यावर आरोप आहे. लेनिनचा खराखुरा मार्ग आम्ही आतां अनुसरतों आहों असा त्यांचा दावा आहे. म्हणून रशियाच्या आजच्या राज्यकर्त्यांच्या स्टॅलिनविरोधी मोहीमेवरून अगर वेगळ्या धोरणावरून त्यांनीं कम्युनिझम, मार्क्सवाद अगर लेनिनवाद सोडला अशी कुणींहि कल्पना करूं नये. याविषयीं कुणाच्याहि मनांत यत्किंचित्हि शंका राहूं नये म्हणून ख्रुचेव्हनेंच अनेक वेळां सांगितलें आहे कीं आम्ही हसतों, आम्ही गोड बोलतों यावरून








कुणीहि असें समजूं नये कीं आम्ही कम्युनिझम अगर मार्क्सवाद यांना सोडचिठ्ठी दिली आहे.

ख्रुश्चेव्हच्या या उद्गारांवरून रशियांतील आजकालच्या घडामोडींचा एक तऱ्हेचा अन्वयार्थ लागूं शकतो. स्टॅलिनच्या कडू बोलण्यानें व ताठर धोरणांनीं कम्युनिझमच्या प्रसाराचा मार्ग अधिक बिकट झाला, लोकशाही राष्ट्रें साशंक झालीं व त्यांनीं आपलें लष्करी सामर्थ्य वाढविलें व जगभर कम्युनिस्ट-विरोधी एकजुटीची फळी निर्माण झाली. या अनुभवानें शहाणे होऊन तर आजच्या नव्या राज्यकर्त्यांनीं कम्युनिझमच्या वाढीसाठीं हा गोड बोलण्याचा आणि स्मित-हास्य करण्याचा नवा मार्ग स्वीकारला नसेल ? आणि हा मार्ग यशस्वी व्हावा यासाठीं आपण स्टॅलिनपेक्षां वेगळे आहोंत असें जगाला दाखविण्यासाठीं तर त्यांनीं एवढी कडाक्याची स्टॅलिनविरोधी मोहीम सुरू केली नसेल ? स्टॅलिनचा सर्वतोपरी धिक्कार केल्याखेरीज जगाचा आपल्यावर विश्वास बसणार नाहीं आणि आपला कार्यभाग साधणार नाहीं, हें ओळखून तर ते आज स्टॅलिनवर आग पाखडत नसतील ? रशियन राजकारणाच्या कांहीं जाणत्या अभ्यासकांना असें वाटतें कीं ही विचारसरणिच आजकालच्या या घडामोडींच्या बुडाशीं आहे. म्हणून त्यांचें असें म्हणणें कीं रशियाच्या राजकारणांत आज घडून आलेला बदल हा केवळ एक डावपेचांचा खेळ आहे. लोकशाहीवादी राष्ट्रांनीं व व्यक्तींनीं त्या डावपेचांनीं फसूं नये आणि रशियाचे कम्युनिस्ट राज्यकर्ते बदलले असा खोटा समज करून घेऊं नये.

### मिळतें घेण्याचें धोरण

स्टालिन-विरोधी मोहीम एवढेंच या घडामोडीचें स्वरूप असतें तर हा युक्तिवाद यथार्थ ठरला असता. पण स्टालिनच्या मूर्तिभंजनाबरोबर इतरहि कांहीं महत्त्वाच्या व नवीन अशा घटना घडलेल्या आहेत. आंतरराष्ट्रीय राजकारणामध्यें रशियाचें सध्याचें धोरण मिळतें घेण्याचें, निदान तेढ वाढूं नये, असें आहे. जर्मनीचें एकीकरण वगैरे महत्त्वाच्या प्रश्नांच्या बाबतींत रशिया अद्याप माघार घ्यायला तयार नाहीं हें खरें, पण नवीन भांडणेंतरी रशिया सध्या उकरून काढीत नाहीं. पॅलेस्टाइन व अरब राष्ट्रें यांच्यामधील भांडणांच्या बाबतींत संयुक्त राष्ट्रसंघाला सर्वानुमतें एक ठराव मंजूर करतां आला तो रशियाच्या या नवीन धोरणामुळेंच. कॉमिन्फॉर्म रशियानें बरखास्त केली. आपलें सैन्य १८ लाखांनीं कमी करण्याचें त्यानें जाहीर केलें आहे. या कृत्यामध्येंहि नवीन धोरणाचा पडताळा दृष्टीस पडतो. तसेंच अगदीं अलीकडील परराष्ट्रमंत्री मोलोटॉव्ह यांचा राजीनामा. मोलोटॉव्हनें इतकीं वर्षें संयुक्तराष्ट्रसंघांत जी नकार घंटा वाजवली तिचा निनाद कमी करण्याचा विचार मोलोटॉव्हच्या या निवृत्तीच्या पाठीमागें असावा.

युगोस्लाव्हियाच्या बाबतींतहि रशियानें आतां वेगळी वाटचाल सुरू केली आहे. ज्या टिटोची शिव्याशाप देऊन कॉमिन्फॉर्ममधून हकालपट्टी झाली त्याच टिटोचा नुक्ताच रशियामध्यें मोठा मानसन्मान झाला. समान दर्जाचा एक सहकारी म्हणून टिटोची संभावना झाली. युगोस्लाव्हिया हें राष्ट्रहि समाजवादी राष्ट्र आहे अशी आतां कबूली देण्यांत आली आहे. समाजवाद प्रस्थापित करण्याचे मार्ग वेगवेगळे असूं शकतात, प्रत्येक राष्ट्रानें रशियाच्या मार्गानेंच गेलें पाहिजे असें नव्हे, ही जी विसाव्या परिषदेंत घोषणा झाली त्याचेंच हें प्रत्यक्ष फळ होय. युगोस्लाव्हियाप्रमाणें भारत, ब्रह्मदेश आदिकरून स्वतंत्र वृत्तीच्या पण लोकशाही धोरणाच्या राष्ट्रांचीहि रशियानें आतां मनधरणी चालवली आहे. आंतरराष्ट्रीय राजकारणांत आपण अगदीं एकटे पडलों आहों ही जाणीव या प्रयत्नांच्या बुडाशीं असावी.

अंतर्गत राजकारणामध्येंहि कांहीं महत्त्वाचे फेरबदल झालेले आहेत. कामगारांच्यावरील कांहीं निर्बंध कमी झाले, कामाचे तास आठाच्या ऐवजीं सात करण्याचें ठरलें, व विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं गुलाम-मजुरांच्या ज्या छावण्या ( slave labour Camps ) देशामध्यें अनेक ठिकाणीं होत्या त्या बंद करून त्या कामगारांना स्वतंत्र कामगारांचे हक्क देण्यांत येणार आहेत.

गुप्त पोलिसांचा ससेमिराहि पुष्कळ कमी करण्यांत आला आहे. पूर्वीप्रमाणें यापुढें मारझोड करून कबुलीजबाब मिळवले जाणार नाहींत आणि केवळ कबुलीजबाबांच्या बळावर कुणालाहि शिक्षा होणार नाहीं. न्यायखातें पूर्वी जें मध्यवर्ती सरकारच्या अधीन होतें, तें आतां घटकराज्यांच्या हवालीं करण्यांत आलें आहे.








इतरहि कांहीं खात्यांच्या बाबतींत हें विकेंद्रीकरणाचें धोरण स्वीकारण्यांत आलें आहे. स्टॅलिनच्या अमदानींत ज्यांच्यावर नाहक आरोप ठेवण्यांत आले होते अशांपैकीं कांहीं जणांची आतां सुटका झाली आहे आणि कांहीं मृत व्यक्तींना त्यानें जो कलंक लावला होता तो धुवून काढण्यांत आला आहे. सैन्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या बाबतींत हा प्रकार प्रामुख्यानें घडला आहे. मार्शल टुकाचेव्हस्की आणि इतर सैन्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्यांचें स्टॅलिननें जें शिरकाण केलें तें चुकीचें व अन्यायाचें होतें अशी आजचे राज्यकर्ते आपणहोऊन कबूली देत आहेत.

## कांहीं मूलभूत स्वरूपाचे बदल

या सर्व घडामोडी लक्षांत घेतल्या कीं रशियन राज्यकर्ते केवळ डावपेंच खेळत आहेत असें मानणें फार कठिण जातें. रशियामध्यें कांहीं महत्त्वाचे आणि मूलभूत स्वरूपाचे फेरबदल घडून येत आहेत हें मानणेंच जास्त सयुक्तिक वाटतें. रशियन राज्यकर्ते एखाद्या चहूबाजूंनीं बंदिस्त अशा प्रयोगशाळेंत प्रयोग करीत असते तर मग गोष्ट वेगळी होती. पण २० कोटी रक्तमांसाच्या माणसांच्या देशामध्यें त्यांना वावरायचें आहे, त्या देशाचें राजकारण त्यांना चालवायचें आहे, आणि त्यांच्या देशावरहि, त्यांनीं त्याच्याभोंवतीं पोलादी पडदा उभारला असला तरी देखील, जागतिक घडामोडींचे परिणाम होत असतात. ही आंतरबाह्य परिस्थिति लक्षांत घेऊनच त्यांना आपल्या राजकारणाचें धोरण ठरवावें लागतें. वास्तविकपणें हा अत्यंत सामान्य असा सिद्धांत झाला. पण रशियाच्या बाबतींत पुष्कळ वेळां याचा अनेकांना विसर पडतो.

परराष्ट्रीय धोरण रशियन राज्यकर्त्यांना जें बदलावें लागलें आहे त्याचें मुख्य कारण म्हणजे बदललेली जागतिक परिस्थिति. ॲटम व हायड्रोजन बॉंबमुळें युद्धाचें स्वरूप पार बदलून गेलें आहे. यापुढें विनाश हेंच केवळ एक युद्धाचें फळ कुणाच्याहि पदरांत पडणारें आहे, म्हणून जागतिक युद्ध हें अटळ नाहीं अशी भूमिका रशियन कम्युनिस्ट पुढाऱ्यांना विसाव्या परिषदेंत स्वीकारावी लागली. जागतिक युद्ध नको तर लहानसहान युद्धें लढून बाहेरचे देश कबजाखालीं आणण्याची इतके दिवस अमलांत आणलेली पद्धतहि सोडायला हवी हेंदेखील त्यांना ओळखावें लागलें. कारण मध्यंतरींच्या काळांत लोकशाही राष्ट्रांची संघटना इतकी वाढली कीं लहान राष्ट्रांवरील आक्रमण हें सर्वांवरील आक्रमण आहे असें समजून तीं राष्ट्रें त्या आक्रमणाचा प्रतिकार करूं लागलीं. लोकशाही राष्ट्रांच्या या निर्धाराचा प्रत्यय रशियाला कोरिया व इंडोचायना या दोन्हीं देशांत आला. या अनुभवामुळेंच सहजीवना-( co-existence ) ची महती रशियाला पटली आणि त्या मंत्रांचा वेळींअवेळीं जप होऊं लागला. सहजीवन हें आज रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचें प्रमुख अंग बनलें आहे, पण तें लेनिनच्या तत्त्वज्ञानाचा नवा साक्षात्कार झाला म्हणून नव्हे तर हायड्रोजन बॉंबच्या विध्वंसक शक्तीमुळें आणि लोकशाही राष्ट्रांमध्यें वाढलेल्या जागरूकतेमुळें रशियाला त्याचा स्वीकार करावा लागला.

जागतिक परिस्थितीप्रमाणें रशियाच्या अंतर्गत परिस्थितीमध्येंहि खूप फरक पडला आहे. १९५५–५६ चा रशिया आणि १९२८–२९ अगर १९३८–३९ चा रशिया यांमध्यें खूप तफावत आहे. उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें कुशल कामगारांची संख्या वाढली आहे. कामगार कुशल बनला व त्याचें उत्पन्न वाढलें कीं त्याच्याठिकाणी सामाजिक व राजकीय जीवनाबद्दलच्या कांहीं आकांक्षा निर्माण होतात व त्या पुऱ्या व्हाव्या यासाठीं त्याची धडपड सुरू होते. रशियामध्यें आतां एक नवीन अधिकाऱ्यांचा वर्ग निर्माण झाला आहे. या वर्गाला स्वास्थ्य हवें, सुरक्षितता हवी, आराम हवा. सर्वसामान्य जनतेच्या ठिकाणींदेखील त्याच आशा–आकांक्षा निर्माण झाल्या असाव्या. रशियन राज्यक्रांतीला सुरुवात होऊन आतां जवळजवळ चाळीस वर्षें झालीं. चाळीस वर्षें क्रांतीच्या नांवानें जनतेची घोडदौड चालू आहे. क्रांतीलादेखील अखेर कांहीं मर्यादा मानाव्या लागतात. लोक आतां कंटाळले असावेत. लोकांच्या मनांतदेखील आतां जरा स्वस्थपणाचें, आरामाचें जीवन जगण्याची इच्छा उत्पन्न झालेली असावी. आसूड हाणून लोकांना दमदाटीनें कामाला लावण्यालाहि सीमा असते. ती सीमा रशियानें आतां गांठली आहे असें दिसतें. या सर्व गोष्टींचा कम्युनिस्ट राज्यकर्त्यांवर परिणाम झाला असावा आणि थोडेंसें नरमाईचें, ढिलाईचें, सवलती देण्याचें धोरण स्वीकारणें त्यांना भाग पडलें असावें.

# रशियामधील अलीकडील घडामोडी

मनुष्याची प्रवृत्ति स्वभावतःच स्वातंत्र्याकडे व स्वास्थ्याकडे असते. ही स्वाभाविक मानवी प्रवृत्ति दडपून टाकण्याचें रशियन राज्यकर्त्यांचे प्रयत्न अनेक वर्षे चालू होते. हे त्यांचे प्रयत्न कायमचे यशस्वी होणें कधींच शक्य नाहीं. पण आतांच ते फसूं लागले आहेत असें दिसतें.

रशियन राजकारणांत कांहीं स्वागतार्ह फरक घडून येत आहेत हें नाकारण्यांत हंशील नाहीं. पण प्रश्न उपस्थित होतो तो हा कीं हे फरक चिरस्थायी स्वरूपाचे आहेत कीं केवळ तात्पुरत्या स्वरूपाचे ? –या प्रश्नाचें निश्चित उत्तर देणें कठीण आहे. आज जे फरक घडून आले आहेत ते केवळ पुढाऱ्यांच्या मर्जीनुसार. उद्यां त्याच पुढाऱ्यांची मर्जी फिरणार नाहीं कशावरून ? आज पुढारी सामुदायिक पुढारीपणाची घोषणा करीत आहेत. पण उद्यां यांच्यांतूनच एखादा जबरदस्त पुढारी निघणार नाहीं कशावरून ? आणि तो आजच्या साऱ्या सुधारणा गुंडाळून ठेवणार नाहीं कशावरून ? स्टालिनदेखील एके काळीं सामुदायिक पुढारीपणाच्या गोष्टी बोलत असे. रशियन राज्ययंत्राच्या स्वरूपांत अद्याप मुळींदेखील फरक पडलेला नाहीं. सर्व सत्ता आज देखील कम्युनिस्ट पक्षाच्याच हातीं आहे आणि पक्षाच्या नांवानें ती चारदोन पुढारी वापरतात. पक्षामध्यें लोकशाही नाहीं आणि लोकांना असे कोणतेहि हक्क नाहींत. त्यामुळें आज घडून आलेल्या सुधारणा उद्यां रद्द होणार नाहींत अशी खात्री देणें शक्य नाहीं. पण एकमात्र आहे कीं एकदां एका दिशेनें चक्रें फिरूं लागलीं कीं नंतर त्यांची दिशा बदलणें कठीण जातें. जनतेला एकदां कांहीं सवलती दिल्या कीं त्या काढून घेणें सोपें नसतें. एवढेंच नव्हे तर एक सवलत दिली कीं दुसरीहि सवलत द्यावी लागते. म्हणून उद्यां ख्रुश्चेव्ह महाप्रबळ झाला तरी त्यालाहि आज ज्या सुधारणा घडून आल्या आहेत त्यांच्यावर बोळा फिरवणें फार कठीण जाणार आहे.

### लोकशाहीपासून अजून दूर !

अलीकडील घडामोडींमध्यें कांहीं स्वागतार्ह भाग आहे याचा अर्थ हा नव्हे कीं रशियामध्यें लोकशाही सुरू झाली अगर रशियानें लोकशाहीच्या दिशेनें पावलें टाकायला सुरुवात केली. रशिया लोकशाहीपासून अद्याप खूप दूर आहे. लोकशाहीचा स्वीकार करावयाचा तर रशियाला स्टॅलिनचाच नव्हे तर मार्क्स व लेनिन यांचाहि त्याग करावा लागेल. स्टॅलिन व स्टॅलिनचीं धोरणें हीं लेनिनचींच अपत्यें आहेत. स्टॅलिनला जन्म देणारा लेनिन व त्याला जन्म देणारा मार्क्स यांचा जेव्हां रशिया त्याग करील त्याच वेळीं तिथें लोकशाहीची उभारणी होऊं शकेल. आणि लोकशाहीची उभारणी करण्यासाठीं रशियाला त्याच्या आजच्या पुढाऱ्यांचाहि त्याग करावा लागेल. कारण आज स्टॅलिनला शिव्या देणारे हे पुढारी काल परवांपर्यंत त्याचे विश्वासू हस्तक होते. त्याच्या साऱ्या अत्याचारांत त्यांचा हात होता. त्याच्या साऱ्या पापांनीं त्यांचेहि हात बरबटलेले आहेत. आज मेलेल्या स्टॅलिनला ते शिव्या देत आहेत, पण आजदेखील आपल्या त्या पापांतील हिस्स्याची कबूली देऊन त्याबद्दल योग्य तें प्रायश्चित्त घ्यायला त्यांची तयारी नाहीं अशा पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं लोकशाहीच्या दिशेनें पावलें टाकणें रशियाला कितपत जमेल याविषयीं दाट शंका वाटते.

स्टालिनचा धिक्कार झाला म्हणजे जशी लोकशाहीची प्रतिष्ठापना झाली असा अर्थ नव्हे, तसाच सहजीवनाच्या धोरणाचा पुकारा झाला म्हणजे कम्युनिस्ट आक्रमणाचें युग संपलें असाहि अर्थ नव्हे. म्हणून रशियन राज्यकर्त्यांच्या आजच्या बदललेल्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल पूर्वीइतकीच जागरूकता ठेवायला हवी. पण जागरूकता ठेवूनहि त्या धोरणाचें स्वागत करतां येईल. स्वागत करून त्या धोरणामुळें जेवढें कार्य आज साधून घेतां येईल तेवढें साधावयास हवें. एखाद-दुसरा गुंतागुंतीचा प्रश्न जरी सामोपचारानें सुटला तरी तोहि एक फायदाच होय. रशियन राज्यकर्त्यांकडून सुचविल्या जाणाऱ्या प्रत्येक योजनेचा निर्विकार बुद्धीनें विचार करून शक्य होईल तोंवर आंतरराष्ट्रीय गुंतागुंती सोडविण्यासाठीं त्या योजनांचा उपयोग करून घेतला पाहिजे. पण त्याचवेळीं सहजीवनाच्या पुकाऱ्यामुळें कम्युनिस्ट आक्रमणाचें भय आतां उरलें नाहीं अशी खोटी कल्पना लोकांच्या मनांत रुजणार नाहीं व वाढणार नाहीं अशीदेखील खबरदारी घेतली पाहिजे. आक्रमणाचा प्रतिकार करण्याची तयारी ढिली पडली तर कम्युनिस्टांचें सहजीवन केवळ शब्दांतच राहील, कृतींत उतरणार नाहीं, हें विसरणें धोक्याचें होईल.

# वेदान्तांतील कांहीं प्रश्न : (चर्चा)

[या जगाचें मूळ तत्त्व कोणतें ? त्याचें स्वरूप काय ? व जगाची उत्पत्ति कशी झाली ? – हे प्रश्न महत्त्वाचे आहेत. या प्रश्नांचीं उत्तरें अद्वैत-वेदान्तांत आढळून येतात. परंतु त्या उत्तरांत सुद्धां कांहीं फरक दिसतो. हा फरक कित्येक वेळां तात्त्विक असतो तर कित्येक वेळां तपशिलांतील तो फरक असतो. अशाच एका प्रश्नासंबंधीं मतभिन्नता दिसून आल्यानें मिरजेचे छंदः-शास्त्रावरील व्यासंगी व तत्त्वजिज्ञासु **श्री. वि. ज. सहस्रबुद्धे** यांनीं वेदान्तांतील कांहीं तज्ज्ञ गृहस्थांकडे पत्रव्यवहार करून खुलासे विचारले. त्यांपैकीं कांहींकडून खुलासे आले. ही चर्चा जिज्ञासूंना उपयुक्त होईल या हेतूनें हा चर्चात्मक पत्रव्यवहार खालीं प्रसिद्ध केला आहे. श्री. सहस्रबुद्धे यांनीं हा पत्रव्यवहार 'नवभारताकडे प्रसिद्धीकरितां दिला याबद्दल त्यांचे आभार. श्री. सहस्रबुद्धे यांचे प्रश्न काय आहेत हें खालील पत्रव्यवहारावरून स्पष्टच होईल. –का. सं. ]

[ 'माझ्या पत्रास अगत्यानें उत्तर दिल्याबद्दल खालील विद्वान् सद्गृहस्थांचा मी आभारी आहे. ]

ता. २६।४।५६

-- **वि. ज. सहस्रबुद्धे** मिरज

## मूळ प्रश्न

उपनिषत्तीर्थ जोग पुणें यांनीं 'पंचदशी'वर ग्रंथ लिहिला आहे. त्यांत " ब्रह्म हें जगताचें कारण असें शंकराचार्य म्हणतात परंतु हें ब्रह्म मूळ शुद्धब्रह्म अथवा मायायुक्त (शबल) ब्रह्म याचा खुलासा शंकराचार्यांच्या विवेचनांत मिळत नाहीं " असें जोग यांनीं मत व्यक्त केलें आहे. तेव्हां आपल्याकडे शंका विचारीत आहें. तरी कृपा करून खुलासा व्हावा अशी नम्र विनंति आहे.

१ 'एकोऽहम् बहु स्याम् प्रजायेय सोऽकामयत' हें स्फुरण अथवा कामना कोणाला झाली ? शुद्ध ब्रह्माला अगर शबल ब्रह्माला ?

ब्रह्माचे दोन प्रकार मानले जातात.

| | |
|---|---|
| शुद्ध ब्रह्म | शबल ब्रह्म |
| निर्गुण ब्रह्म | सगुण ब्रह्म |
| निरुपाधिक ब्रह्म | सोपाधिक ब्रह्म |
| निर्विशेष ब्रह्म | सविशेष ब्रह्म |

२ मायायुक्त ब्रह्म म्हणजे शबल ब्रह्म हें जगताचें कारण, अगर कसें ? शंकराचार्य 'जगताचें कारण' या अर्थी ब्रह्म शब्द वापरतात त्या ठिकाणीं ब्रह्म शब्दाचा अर्थ कोणता ?

३ शबल ब्रह्म म्हटलें म्हणजे त्या अपेक्षेनें शुद्ध ब्रह्म ही कल्पना आलीच. शुद्ध ब्रह्माचें शबल ब्रह्म कसें झालें ?

४ ब्रह्म, परब्रह्म, ईश्वर, परमेश्वर, असे शब्द वापरले जातात. ब्रह्मसूत्र – शांकरभाष्यांत हे शब्द एकार्थक आहेत अगर भिन्नार्थक आहेत ? यासंबंधीं संदिग्धता उत्पन्न होते तरी स्पष्टता झाल्यास उपयुक्त होईल.

– वि. ज. सहस्रबुद्धे, (मिरज)

## उत्तरें :

### ब्रह्म शबल, विश्वाच्या अपेक्षेनें

उपनिषत्तीर्थ जोग यांचें पुस्तक माझ्याजवळ नाहीं. त्यामुळें त्यांच्या विधानासंबंधीं मला कांहीं सांगतां येणार नाहीं.

परंतु आपण त्यांचें म्हणणें काय आहे तें सांगितलें आहे तें खरें असें गृहीत धरून उत्तर देतों. त्यांचें म्हणणें असें – " ब्रह्म जगताचें कारण, असें शंकराचार्य म्हणतात. परंतु हें ब्रह्म मूळ शुद्धब्रह्म अथवा मायायुक्त ब्रह्म (शबल) याचा स्पष्ट खुलासा शंकराचार्यांच्या विवेचनांत मिळत नाहीं. "

यासंबंधीं शंकराचार्यांनीं अत्यंत विस्तृत खुलासा केला आहे व तो सुद्धां अनेक ठिकाणीं. तो खुलासा स्पष्टहि आहे. समाधानकारक आहे कीं नाहीं हें ज्याचें त्यानें स्वतः ठरवावें. उदाहरणार्थ :— शारीरक भाष्यांत २।१।१४ या सूत्रावरील विवरणांत आचार्यांनीं विस्तारानें या मुद्द्याचा खल केला आहे. "नित्यशुद्ध-बुद्धमुक्तस्वरूपात् सर्वज्ञात् सर्वशक्तेः ईश्वरात् जगत् — जनिस्थितिप्रलयाः' नाचेतनात् प्रधानात् अन्यस्मात् वा इत्येषोऽर्थः प्रतिज्ञातः...... । सा प्रतिज्ञा तदवस्थैव, न तद्विरुद्धोऽर्थः पुनरिहोच्यते । ("नित्यशुद्ध-बुद्धमुक्तस्वभाव असलेल्या सर्वज्ञ व सर्वशक्तिरूप ईश्वरापासून जगताची उत्पत्ति, स्थिति व नाश होतात. अचेतन प्रधानापासून वा अन्यापासून नव्हे. हा मुद्दा प्रतिज्ञेनें सांगितला आहे. ही प्रतिज्ञा खरी आहे. तिच्या-विरुद्ध मुद्दा येथें सांगितला नाहीं. " )

" कथं नोच्यते, अत्यन्तमात्मनः एकत्वं अद्वितीय-

स्वेंच व्हवता । शृणु, यथा नोच्यते । ”

( “ विरुद्ध मुद्दा सांगितला नाहीं असें कसें म्हणतां ? आत्मा केवळ एकच अद्वितीय आहे असें तर म्हणत आहांत ! ऐका, कसें तसें म्हणत नाहीं तें. ” )

“ सर्वज्ञस्य ईश्वरस्य आत्मभूते इव अविद्याकल्पिते नामरूपे ...... संसारप्रपंचबीजभूते सर्वज्ञस्य ईश्वरस्य माया, शक्तिः, प्रकृतिरिति च श्रुतिस्मृत्योरभिलप्येते । ताभ्यामन्यः सर्वज्ञ ईश्वरः । ”

( “ सर्वज्ञ ईश्वराचीं जणूं काय आत्मरूपच असलेलीं, अविद्येनें कल्पिलेलीं नामरूपें होत; तीं संसार प्रपंचाचीं बीजें होत; तींच सर्वज्ञ ईश्वराची माया, शक्ति, वा प्रकृति होय, असें श्रुतिस्मृतीमध्यें म्हटलें आहे ” )

“ तदेवमविद्यात्मकोपाधिपरिच्छेदापेक्षमेव ईश्वरस्य ईश्वरत्वं सर्वज्ञत्वं सर्वशक्तित्वं च । न परमार्थतो विद्यया अपास्तसर्वोपाधिस्वरूपे आत्मनि ईशित्रीशितव्यसर्वज्ञत्वादिव्यवहारः उपपद्यते । ”

( “ म्हणून अशा रीतीनें अविद्यारूप उपाधीच्या मर्यादेच्या अपेक्षेनें ईश्वरला ईश्वरत्व, सर्वज्ञत्व व सर्वशक्तित्व आहे. परमार्थतः म्हणजे वस्तुतः ज्ञानद्वारा सर्व उपाधि निरस्त झालेल्या स्वरूपाच्या आत्म्याचे ठिकाणीं नियन्तृत्व, नियन्तव्यत्व किंवा सर्वज्ञत्व इत्यादि व्यवहार उपपन्न होत नाहीं ” )

“ ... ... परमार्थावस्थायां ईशित्रीशितव्यादिव्यवहाराभावः प्रदर्श्यते । व्यवहारावस्थायां तु उक्तः श्रुतावपीश्वरादिव्यवहारः । ”

( “ परमार्थावस्थेमध्यें नियन्तृत्व, नियन्तव्यत्व इत्यादि व्यवहार नाहीं; पण व्यवहारावस्थेंत श्रुतींतहि ईश्वर इत्यादि व्यवहार आढळतो. ” )

आतां तुमच्या चार प्रश्नांचीं उत्तरें अशीं – प्रथम चवथा प्रश्न घेतों. कारण त्याचें उत्तर वरील शांकरभाष्यांत आलें आहे. मायायुक्तब्रह्म = ईश्वर, असा अर्थ आचार्यांनीं स्वतःच सांगितला आहे.

( प्रश्न १ ) मूळ शुद्धब्रह्मांत “ एकोऽहं बहुस्याम् प्रजायेय ” हें स्फुरण अथवा इच्छा नाहीं. व्यवहारांत किंवा विश्वाचें अस्तित्व गृहीत धरूनच वरील इच्छा संभवते. शुद्धब्रह्म हें सर्वकालीं शुद्धच; म्हणजे तें निर्विकल्प निरिच्छ असतें.

(प्रश्न २) शंकराचार्य जगताचें कारण “ ब्रह्म ” असें म्हणतात तेव्हां त्याचा अर्थ “मायायुक्त ब्रह्म” असाच आहे. “ ब्रह्म ” शब्दाचा किंवा कोणत्याहि त्या अभिप्रायानें ( ब्रह्म शब्दाचा पर्याय म्हणून ) वापरल्या जाणाऱ्या शब्दाचा “ शुद्धब्रह्म ” हा अर्थ वाच्यार्थ होऊंच शकत नाहीं. ( शबल ) मायायुक्त ब्रह्म वा ईश्वर हाच त्या सर्व पर्यायांचा वाच्यार्थ होय. ब्रह्मशब्दाचा निरूढ लक्ष्यार्थ “ शुद्ध ब्रह्म ” होय; “ ईश्वर ” शब्दाचा “ शुद्ध ब्रह्म ” हा रूढ लक्ष्यार्थ नाहीं; असा “ईश्वर” व “ब्रह्म” शब्दांचा फरक आहे.

( प्रश्न ३ ) शबल ब्रह्म म्हटलें म्हणजे नंतर ‘ शुद्ध ब्रह्म’ ही कल्पना आलीच पाहिजे हें खरें. परंतु मूळ शुद्धब्रह्माचें शबल ब्रह्म बनत नाहीं. त्या दोहोंत पौर्वापर्य नाहीं. शुद्ध ब्रह्म त्रिकालाबाधित आहे, कालातीत आहे. विश्वाचें मूळ “ शबल ब्रह्म ” होय. ब्रह्म शबल विश्वाच्या अपेक्षेनें; वस्तुतः विश्व नाहीं म्हणून ब्रह्महि वस्तुतः शबल नाहीं. कळावें

— **लक्ष्मणशास्त्री जोशी**, वाई.

## शुद्ध ब्रह्माच्या इच्छेनें शबल ब्रह्म झालें

आपलें पत्र पोंचलें. “ बहु स्यां प्रजायेय ” ही स्फूर्ति कोणाला झाली, शुद्ध ब्रह्माला का शबल ब्रह्माला, अशी शंका कां विचारतां ? तुम्हांला श्री-शंकराचार्यांचेंच मत पाहिजे असल्यास तें तैत्तिरीय उपनिषदांतील ब्रह्मवल्लींत हें वाक्य आहे त्यावरील शांकर भाष्यांत पहावयास मिळेल. त्या भाष्यामध्यें ‘ बहु स्याम् ’ याचें स्पष्टीकरण असें दिलें आहे कीं, “ न हि पुत्रोत्पत्त्या इव अर्थान्तर–विषयं बहुभवनं, कथं तर्हि, आत्मस्थानभिव्यक्तनामरूपाभिव्यक्त्या । यदा आत्मस्थे अनभिव्यक्ते नामरूपे व्याक्रियेते, तदा नामरूपे आत्मस्वरूप – अपरित्यागेन एव ब्रह्मणाऽप्रविभक्तदेशकाले सर्वावस्थासु व्याक्रियेते, तदा तन्नामरूपव्याकरणम् ब्रह्मणो बहुभवनम् ”

या उताऱ्यावरून आचार्यांनीं शुद्धब्रह्मालाच स्फूर्ति झाली असें दर्शविलें आहे. आणि अशी स्फूर्ति होण्यापूर्वी शुद्धब्रह्माचें शबल ब्रह्म होण्याचें कारण काय ? सृष्टि–उत्पत्तीची इच्छा झाल्यानेंच केवळ एकजिनसी ब्रह्मस्वरूपांत शबलत्व येणार व त्यालाच सगुणब्रह्म, हिरण्यगर्भ, इत्यादि नामें मागाहून मिळणार.

श्रीशंकराचार्यांनीं वर दिलेल्या उताऱ्यानंतर ‘ ब्रह्म ’ शब्द सोडून ‘ आत्मा ’ हा शब्द वापरला आहे. ‘ स आत्मा एवंकामः तपोऽतप्यत ’ असें म्हणून पुढें ‘ आत्मनः आकाशः संभूतः, आकाशात् वायुः ’



अनुक्रमणिका






इत्यादि प्रक्रिया जोडली आहे. त्यावरून 'ब्रह्म' आणि 'आत्मा' यांत आचार्य भेद मानीत नाहींत. पूर्ण अद्वैत मानतात. हें उघड आहे.

दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर पहिल्या प्रश्नाच्या स्पष्टीकरणांत आलेंच आहे. शुद्धब्रह्माचें शबलब्रह्म झालें, तें शुद्धब्रह्माच्या इच्छेनें आणि आत्मिक शक्तीनें झालें.

भाषेंत आपण शब्द वापरतांना नीटशी काळजी घेत नाहीं त्यामुळें ईश्वर, परमेश्वर, तसेंच आत्मा, परमात्मा, शुद्ध ब्रह्म, शबलब्रह्म, इत्यादि शब्द जणूं काय एकमेकांचे पर्यायच आहेत अशासारखे वापरले जातात. पण. त्यांत अगदीं व्याकरणदृष्ट्या पाहिल्यास फरक आहे. पण सामान्य व्यवहारांत न्यायशास्त्रांतल्याप्रमाणें अगदीं काटेकोर शब्दप्रयोग केला जात नाहीं. पण प्रत्येक शब्दांत वरच्या खालच्या पायरीसारखा फरक आहे.

'सोऽकामयत' हें वाक्य तैत्तिरीय उपनिषदाशिवाय तलवकार ब्राह्मण, बृहदारण्यकोपनिषद्, शतपथ ब्राह्मण, जैमिनीय ब्राह्मण इत्यादि ठिकाणीं थोड्याबहुत फरकानें आलें आहे. त्यांतील बृहदारण्यकोपनिषदांत आचार्यांचें भाष्य पुनश्च आलें आहे. तेंहि पहावें.

कळावें

— ज. स. करंदीकर, पुणें. २

## आत्यंतिक भेद मानीत नाहींत

१ शुद्ध ब्रह्माहून भिन्न कोणी नाहींच, असा वेदान्त–सिद्धांत पाहतां शबलाला तरी पृथक् अस्तित्व देतां येईल काय! ब्रह्मसूत्रभाष्यांत प्रथम सूत्र संपतां संपतां "अस्ति तावत् ब्रह्म नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावम्, सर्वज्ञं, सर्व शक्ति-समन्वितम्" असा भाष्यकारांचा स्पष्ट उल्लेख आहे. यावरून जीव व ईश्वराप्रमाणें शुद्ध व शबलाचा भेद भाष्यकारांना इष्ट दिसत नाहीं. असें ठरल्यास शुद्धाचें शबल कसें झालें असा शुद्धशबलांचा भेद गृहीत धरून केलेला प्रश्न उद्भवत नाहीं.

२ 'अभिध्योपदेशात् च' ब्रह्मसूत्र १-४-२४ यावरील भाष्यांत 'बहु स्याम्' हा संकल्प आत्म्याचा आहे व तो त्याचें कर्तृत्व व प्रकृतित्व सुचविणारा आहे, असें आचार्य म्हणतात. येथें 'आत्मनः' असा सामान्य शब्द आहे. 'शबलात्मनः' असा शब्द नाहीं. यावरून ही स्फूर्ति कोणास मानावी तें कळून येईल.

याप्रमाणें वरील भाष्यप्रमाणावरून दिसणारा एक स्वतंत्र मुद्दा मांडला आहे. त्या दृष्टीनें प्रश्नाचें निरसन व्हावें असें वाटतें.

(पुनः विचारल्यावरून दुसरें उत्तर आलें तें)

संकल्प कोणाचा हा प्रश्न तूर्त तसाच ठेवून शुद्धापेक्षां शबल हें अत्यन्त भिन्न आहे काय? या प्रश्नाचा प्रथम विचार व्हावा. या दृष्टीनेंच मी मागील पत्रांत विचार मांडले आहेत. त्यांत दिलेल्या एक दोन भाष्यांतील उताऱ्यांवरून भाष्यकार शुद्धशबलाचा आत्यंतिक भेद मानीत नसावेत असें वाटतें. आणि हें जर सिद्ध झालें तर संकल्प कोणाचा हा प्रश्न उद्भवणार नाहीं. कौंतेय आणि राधेय या दोन व्यक्ति भिन्न मानाव्यात कां? कौंतेयालाच फक्त राधेयत्व – धर्माची कल्पना केली गेली! आणि ती धर्मकल्पनासुद्धां इतर पाहुण्यांचीच मानावी लागेल. राधेयत्वाची ज्याच्यावर कल्पना केली गेली तो नेहेमींच स्वतःच्या कौंतेय स्वरूपाला न विसरणारा असाच होता. 'जीव ईशो विशुद्धा चित्' या कारिकेप्रमाणें सहा पदार्थ अद्वैत वेदान्त्यांनीं अनादि मानले आहेत. त्या दृष्टीनें शुद्ध – शबलांचा भेद मानावयाचा असल्यास, संकल्प शुद्धालाच, पण त्यामुळें येणारें शबलत्व, हें अनादि असल्यानें अविवेकरोबरच तेंहि आहे. त्यांचें पौर्वापर्य नाहीं, असें उत्तर संभवेल. कळावें.

— दत्तात्रेय कवीश्वरशास्त्री (पुणें)

## उपपत्ति सांगण्याचा श्रुतीचा हेतु

आपली शंका योग्य आहे. 'एकाकी न रमते' वगैरे व्याख्यान जगत् कांहीं निर्माण झालें असें मानून कांहीं कल्पना येण्याकरितां केलेलें आहे. वास्तविक 'न निरोधो नचोत्पत्तिः' हाच मूळ सिद्धान्त. समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें "जें झालेंचि नाहीं। तयाची वार्ता पुससी काई।"

नाथ म्हणतात– "प्रपंच एक झाला होता। हे समूळ मिथ्या वार्ता। पुढें होईल मागौता। कदा कल्पान्तीं घडेना॥"

याला अजातवाद म्हणतात. जगत् झालें असें दिसतें. तेव्हां पटेल थोडीबहुत, अशी उपपत्ति सांगणें, येवढाच श्रुतीचा हेतु. व म्हणूनच वेगवेगळया ठिकाणीं थोडी वेगवेगळी सांगी आहे. कोठें पंचीकरण आहे. कोठें त्रिवृत्करण आहे. 'स्फूर्ति' मानीव आहे व ती मूळ निर्गुणांतच मानणें अवश्य आहे.

श्री ज्ञानदेव म्हणतात--

निर्विकल्पाचिये बरडीं। फुटे आदिसंकल्पाची विरूढी। गीता अ. ७ दैवी ह्येषा०

कळावें

–शं. वा. दांडेकर (पुणें)








श्री. दत्ता कदम

# विंदा करंदीकरांचा 'मृद्-गंध'

प्रत्येक कालांतील समाजाच्या कांहींएक निष्ठा असतात. त्या निष्ठांच्या निरपेक्ष कुठलीहि कलाकृति जन्म पावूं शकत नाहीं. जन्मतेवेळींच ती कलाकृति स्वतःचा आकार, रंग, स्वभाव निश्चित करीत असते. 'मृद्गंधां'त याची प्रतीति साकल्यानें येते.

करंदीकरांच्या कवितेचं बरंचसं खरंखुरं स्वरूप 'मृद्गंधां'त प्रकट झालं आहे. 'स्वेदगंगा' ते 'मृद्गंध' ही नवीं नवीं क्षितिजें अंकित करणारी त्यांची वाटचाल इतक्या भरारीनें झाली आहे कीं आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासांत ती अजोड ठरावी. ही कविता जितकी निवांत आहे तितकीच अंतरात्म्यांत खळबळ उडविणारी, अस्वस्थ करणारी आहे. तिच्या या आगळेपणानें मला त्यांचें काव्य अधिक आवडतें. तरीहि त्यांतल्या कांहीं सबंध कविता आवडतात, कांहींतील एखादं दुसरं कडवंच आवडतं तर कांहींतली फक्त एखादी ओळच आवडते. असं जरी असलं तरी त्या एका ओळींतहि करंदीकरांचें जिवंत व्यक्तित्व सार्थ उभें असतें, त्यांचें सामर्थ्य त्यांत असतें आणि तें सामर्थ्य मनाला भुरळ घालतें. ती भुरळ नेहमी डोळस राहील अशी लकबहि त्या ओळींत असते.

'मृद्गंध' या शीर्षकासाठीं एखादीहि कविता न लिहिलेला असा हा संग्रह आहे. मृद्गंध जर प्रत्येक कवितेंतून पसरत आहे तर एखाद्या दहापंधरा ओळींच्या कृत्रिम कवितेंत तो बंदिस्त करण्याचें कारणच काय ? 'त्रिवेणी'च्या दहाव्या भागांत हा शब्द एकदां आला आहे. आणि त्याच्या अस्तित्वानें, संग्रहानें स्वतःला नामांकित करून घेतलें आहे.

'मृद्गंधां'त अनुभवांच्या केवळ निष्प्राण निरूपणापेक्षां सत्यानुभूतीचा सत्याविष्कार असल्यामुळें ओळीं-ओळींतून कवीचें व्यक्तित्व पार मिसळून गेलें आहे. कवीच्या व्यक्तित्वांत आणि काव्यांत कुठेंहि भिंत उभी असलेली आढळून येत नाहीं. प्रत्येक अभिजात कलावंत स्वानुभूतीशीं प्रामाणिक असतो. पण त्याचा आविष्कार मनाप्रमाणें होतोच असें नाहीं. ती रुखरुख कवीनें,

> 'अर्थ चालला अंधारींतून
> शब्द बिचारे धडपडले'

या ओळींत व्यक्त केली आहे.

एकतारीऐवजीं सतारीची प्रतिमा विंदांच्या लेखणीला प्यारी असावीशी वाटते. या व्यक्तित्वांत केव्हां केव्हां तोचतोपणा शिरल्यावर त्याच सतारीची एकतारी झाल्याचीहि जाणीव त्यांना डंख मारीत रहाते. मग ते उद्वेगानें इतकेंहि म्हणावयाचें कमी करीत नाहींत कीं—

> 'आत्माहि तोच तो
> हत्याही तीच ती;
> कारण जीवनही तेंच तें
> आणि मरणही तेंच तें...'

याचबरोबर 'असा मी...तसा मी...कसा मी कळेना!' असं सांगायचीहि धडक आहेच. असं आहे म्हणूनच त्यांचें व्यक्तित्व बहुरूपी बनलं आहे, 'ती जनता अमर आहे' असा तें उद्घोष करीत आहे, 'त्रिवेणीं'त डुंबत आहे, 'दांतापासून दांताकडे' जात आहे, 'धोंड्या न्हाव्या'च्या जीवनांत डोकावून बघत आहे, 'आम्ही सारेच नाचतों गोंधळ' असें बिनदिक्कतपणें म्हणत आहे, भेंडवताच्या कोंडीला आणि भंगाईच्या चाळयालाहि नाक न मुरडणारं आहे, नको नको तें मनांत येतें असं मन उघडं करीत आहे, चिंवचिंवणाऱ्या वाटेचा हव्यास धरीत आहे, माडांमधून सौंदर्याच्या अद्भुततेंतला जीवनरस पिऊन घेत आहे, 'प्रेम करावें असें परंतु... प्रेम करावें हें कळल्याविण' असें गुणगुणत आहे आणि –

> 'बाप कसा तूं असा नपुंसक
> जारपुत्र मी काय जडाचा ?'

असा रोखठोक जबाब विचारीत आहे. त्यांत कुठेंहि

'मृद्गंध'– विंदा करंदीकर, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई, किं. ३ रु.






लपवाछपवी नाहीं, या बोटावरची थुंकी त्या बोटावर नाचविण्याची चतुराई नाही. जें कांहीं आहे तें सर्व सरळ आहे. कविता म्हणजे आत्म-संशोधन (discovery of self). आणि याचाच पडताळा म्हणूनच कीं काय त्यांच्या कवितेंत आत्मा हा केवळ शब्द येत नाहीं तर असतील नसतील तेवढे सर्व अर्थ घेऊन येतो.

वैयक्तिकतेंतून करंदीकर ज्यावेळीं समाज-पुरुषांत विलीन होतात तेव्हां त्यांच्या लेखणींतून ज्या कविता कागदावर उतरतात त्या कविता अखिल मानवतेच्या आशानिराशांना गवसणी घालूं बघतात. अशा कवितांचा आवांका दांडगा आहे. त्यांत इजिप्तच्या पिरॅमिडला, स्फिंक्झला, चीनच्या भिंतीला, नीग्रोंना मज्जाव नसतो. संतांचे संतपण त्यांत साकारतें. यीटस्च्या बाबतींत टी. एस्. एलियटनें म्हटलें आहे कीं 'As he became more Irish, he became more universal'. पण करंदीकरांच्या कवितेबद्दल उलट प्रत्यय येतो. त्यांची कविता सारी मानवजात एकदमच आपल्या पंखाखालीं घेते. या वृत्तीमुळेंच 'ती जनता अमर आहे' मधील 'नाहीं रे उजाडत' या तीन शब्दांत जीवनाशयाची सर्व आर्तता उचंबळून आली आहे.

'जरी आरवला पहांटेचा कोंबडा  
फ्रान्सच्या खुराड्यांत आणि नंतर  
फुटलें तांबडें रशियाच्या क्षितिजावर  
जरी चीनवर उधळला गुलाल  
उगवल्या आशांचा आणि सूर्य पक्षी  
लागले गाऊं सातसप्तकांतुन  
नाहीं रे उजाडत...'

हा कबुलीजबाब प्रतिभेच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा वाटतो. कुठल्यातरी 'इझम्'च्या वेटोळयांत हें व्यक्तित्व अडकलेलं नाहीं. 'वाटतें जगावें, वाटतें जगवावें' याचा त्यानें ध्यास घेतला आहे. कारण

" अजूनही अजूनही करत्ये आशा  
दुःखाच्या दरियाची तीनच आचमनें,  
व्यापिते जाणिव, उरते दशांगुल.  
नाकारतां नाकारतांही जातें जीवन  
आनंद आकारीत ... ...  
अजूनही कोणी निळया डफावर  
विजेची थाप हाणुन उद्गारतो :  
'तूं जगशील, तुम्ही जगाल."

ही केवळ घोषणा नाहीं किंवा केवळ गळयापर्यंतचीच सहानुभूति नाहीं याचा उलगडा,

'मला एक कळलें आहे  
सुवर्णाच्या रथांत बसून  
सत्य येथून पळलें आहे,  
प्रत्येकाच्या छातीवरती  
चाकोरीची खूण आहे ...'

या ओळींत होतो.

मात्र 'ती जनता अमर आहे' या कवितेंत समाजाच्या कांहीं मेलेल्या दोषांना पुन्हां ते जिवंत असल्याप्रमाणेंच त्यांवर कांहीं सडकून लिहिण्यांत जी रक्ताची उकळी खर्ची पडली आहे ती अनावश्यक वाटते. आशयाच्या गतीला बेडी पडते. यंत्रावताराचें स्वागतहि 'अति' आणि 'संयमरहित' वाटतें. अशावेळीं 'क्रांतिकारक' हा 'कवी'ला मागें टाकतो व आपलेंच घोडें पुढें दामटतो. पण विंदांची ती अविभाज्यच बाजू आहे असें म्हणावें लागतें.

कविता कितीहि मुक्त झाली तरी लय (Rhythm) सोडूं शकत नाहीं. करंदीकरांच्या मुक्तछंदानें लय कधींच टाकलेली नाहीं. आणि यामुळेंच त्यांच्या मुक्तछंदांतील समंजस रसिकाला आवाहन करण्याचें सामर्थ्य टिकून आहे. यंत्रावताराचा 'चिरडीत ये भरडीत ये' पासूनचा भाग, 'ती जनता अमर आहे' मधील अखेरचा भाग 'माझ्या परसांत एकच झाड', 'नाहीं रे झेंपत', 'गर्भाधान', 'पांथस्थ पक्षी' 'माझ्या मना बन दगड', 'दांतापासून दांताकडे'– या कांहीं कविता विधानाची साक्ष देतील.

समाजमनाच्या जाणिवेच्या जागरूकतेबरोबरच त्यांची कविता अध्यात्माच्या परिभाषेचा डांगोरा न पिटतां अध्यात्माकडे समंजस रसिकाला ओढून नेते. त्यांचें हें अध्यात्म या मातींत रुजलेलें आहे, ऐहिक आहे, 'हे माडांनो,' 'शाप,' 'हीच दैना,' 'माझ्या मना बन दगड,' 'सांवल्या,' 'आम्हीं–दोघे,' 'हे आइन्स्टीन्,' 'वरदान,' 'ईहृ,' 'सुखाच्या शोधांत' वगैरे कवितांत ही प्रतीति चटकन् येते. ही अध्यात्माची दिशा नसती तर










'या तुझिया एका पापानें
मानवता झाली तेजोमय,
काय तमा तिजला स्वर्गाची ?
ह्या नरकाचें काय तिला भय ?
अनंत पापें अशीं करावीं;
अनंत मरणें घेऊन माथीं.
ज्ञानतरूच्या त्याच फळास्तव
आज जहालों मी तव साथी...'

किंवा

'तिथेंच सांपडतें
शेवटचें तीर्थ;
जें करितें
कमलाच्या करानें
माझ्याच आत्म्याची
तीन आचमनें
आणि चढवितें
मुक्तीला बाळसें !'

या ओळींना एवढी जिवंतता आली नसती ! या अध्यात्मांत जीवनोपासकाची सत्यपूजा आहे.

'वर्गमूळाची कविता'हि अशीच आहे. एका निबंधाला ललामभूत करणाऱ्या वर्गमूळाला इथें काव्यात्मक अभिव्यक्ति मिळाली आहे. प्रथम थोडी उखाणेवजा झालेली रचना पुढें आलेल्या ओळींनीं पार झांकून टाकली आहे. 'दार उघड दार उघड' हे, समंजस रसिकाच्याहि आत्म्यांतून उठणारे शब्द आहेत.

'प्रकाशाचा बाप कोण ?
विजेला कां असेल आओ ?'

हे प्रश्न कडवट बुद्धिवाद्यालाहि केव्हां ना केव्हां सतावल्याशिवाय रहात नाहींत.

विंदांच्या प्रीतिकवितेची ठेवण व देखणेपणा त्यांच्याच—

'संथ निळा खोल डोह;
पंथ तृणांतिल हिरवा;
निजलेल्या पाण्यावर
बगळयांचा शुभ्र थवा;
नील नभा लुचणारी
नील नील गिरिशिखरें,
रात्रींच्या खडकांतिल
सनओचे गार झरे...'

यांतील प्रतिमेसारखी आहे. रेग्यांच्या प्रीतिकाव्यांत थोडा तरी शब्दांचा मोह पडतो. पण इथें शब्दाकडे प्रथम लक्ष जात नाहीं. अर्थ अगोदर आणि नंतर शब्द अशीच बहुतांशीं स्थिति होते.

'आम्हीं दोघे
प्रयोगशाळेंतील
विज्ञान - महर्षी;
जीवनयोगाचे
उपासक कलावंत'

ही त्यांची निष्ठा आहे. आणि

'म्हणून करतों
आम्हीं दोघे
इंद्रियांची पूजा
आत्म्याच्या प्रकाशांत'

या ओळी व 'आम्ही दोघे' ही सर्व कविता त्यांच्या प्रीतिकवितेचें यथार्थ दर्शन घडवूं शकतात. कधींहि भंग न पावणारी ही त्यांची रक्तसमाधि आहे.

'त्रिवेणी' जरी अपुऱ्या प्रीतीची कहाणी असली तरी ती अत्यंत शांत चित्तवृत्तीची द्योतक आहे; जशी आंबराईंतली दुपारची सांवली. मराठी साहित्याच्या याच कालखंडांतील पु. भा. भाव्यांची 'स्वप्न' ही कथा याच भूमिकेवरून आहे. 'त्रिवेणी'नें मुक्तछंदाची कसोटी पाहिली आहे. आशयाचा कडूगोडपणा, हळुवारपणा व वादळीपणा पेलण्यांत, मुक्तछंद इथें कसोटीला उतरला आहे. बऱ्याचशा पायऱ्या गाळून बीजगणित सोडविलें जातें त्याप्रमाणें,

'मी पाहिली
बुडतांना तहानलेली, फुटूनहि अतृप्त
एकटी, एकेकटी, एकट्यानें, एकांतांत'

किंवा

'म्हणालीस निःशब्दानें,
शब्दातीत, असह्य. पेटवतांना
पेटलेली.'

'विजेच्या झोतांत
डळमळले प्रासाद उचमळलेल्या सरोवरांत,
झालें कणाशीं क्षणाचें मीलन.'

किंवा

'पेटलेला पर्जन्य,
स्मृतींच्या ठिणग्या, ठिसूळ, ठेचलेल्या'



अनुक्रमणिका






किंवा

' लावलीस तव्रकडी प्रत्येक पेशीची,
जिच्या सजीवतेंत होते कोरलेले
अनादी रक्तसंगीत ...
... बांधलेस नाग
विजेच्या कमरेला ...
आणि शिरशिरली
स्पर्शाची पालवी रक्ताच्या मोहरावर ... '

यांतील कांहीं कांहीं शब्दचित्रें नितांत बहारीचीं आहेत. त्यांपैकीं

' त्या दिवशीं
तूं परतलीस निराळया दिशेनें
नेहमींच्या वाटेला, डाव्या पायाच्या
उर्मट आंगठ्यानें जेव्हां चिरडलास
फुललेला तेरडा. '

हें तर अत्यंत हृदयंगम आहे.

करंदीकरांच्या प्रीतिकवितेंत उदात्ततेचा बाजार मांडलेला आढळत नाही. त्यांची प्रीतिकविता बरीचशी सेंद्रिय ( sensuous ) आहे. सखीशीं प्रामाणिक आहे.

' अश्रूंनीं धुवुनी मम
पापाच्या सर्व खुणा
तूं मजला वरिलें हा
तव वेडा थोरपणा '

अशी ते स्वतःकडे कमीपणाची मालकी घेतात. तर

' काळया काळया कुट्ट वासना
काळोखांतून जिभल्या चाटित
तुझ्याच काळया करवंदास्तव
गेल्या धांवत, गेल्या धांवत... '

अशी कुठलाहि आडपडदा न ठेवतां उधळण करतात. ' अतृप्ति माझा वर ' असें आळवतां आळवतां ते

" सगळें मिळतें सगळें मिळतें
बोलतेस तूं जेव्हां ' राजा ' "

अशी गुलमोहरी समाप्ति करतात. ' डोळयांतल्या डोहामध्यें ', ' असेंच होतें म्हणायचें तर ', ' उपजत होती तुला कला ती ', ' अनोळखीशी आलिस तेव्हां ', ' या जन्माला फुटे न भाषा ', ' असें कांहीं तुला द्यावें ', 'तव माझें आज सुरूं', 'तूं नसतीस तर ' या कवितांतील शुध्द भावुकतेची हिरवळ आपल्या अंतरात्म्याला तन्मय करते. विंदांच्या प्रीतिकवितेंत कुठेंहि उसनें अवसान नाहीं.

' बाळ होउनी कुशींत यावें ' ही कविता दुधावरच्या साईसारखी आहे. जी प्रतिभा ' पदराच्या अभयाखालीं डोळयांनीं हे पंख मिटावे ' म्हणते, तिला अद्‌भुताचेंहि वावडें नाहीं. ' आजीचा इशारा ' ही प्रतिभा निमूटपणें ऐकून घेत आहे.

कोकणांतील धोंड्या न्हाव्याचें व्यक्तिचित्र खुमासदार आहे. तरी त्यांतील अखेरच्या सात ओळी निष्कारण तार ताणल्यापरी वाटतात. टक्कलापर्यंत पोंचण्याची कांहींच जरूरी नव्हती.

करंदीकरांच्या प्रतिभेला ' स्थलकालाचा गुंता ' सोडविण्यासाठीं ' प्रकाश-वेगानें ' ' अनंताकडे ' झेंप घेण्याची ' जळती इच्छा ' आहे. आणि या अनुभूतीच्या आविष्कारासाठीं मुंडकीं नसलेले कबंध, प्रकाश, नपुंसक, लाललाल रक्तरंग निळें नभ, मांजर आणि उंदीर, मोरपिसें, वीज, क्रांति, डफ, माती, गर्भ, कफनी, पापी, स्तन, विश्व, स्वप्न, खोल डोह, दरी, अश्वत्थ, वडांची दाढी वगैरे प्रतिमा बऱ्याचशा येत रहातात. प्रत्येक कलावंताच्या कांहीं मर्यादा असतातच आणि त्या मर्यादेंतच ती ती कलाकृति किती चांगली व उच्च आहे याचा विचार करणें अधिक रास्त आहे. कलाकृतीचा मागोवा घेत असतांना समंजस रसिक स्वतःचाहि मागोवा त्यांत घेत असतो.

कलाकृति म्हणजे जनतेच्या आत्म्याशीं कलावंताच्या आत्म्याचा संवाद ( communion ) होय. कलावंत कलाकृति जितकी स्वतःकरितां निर्माण करतो तितकीच ती तो जनतेकरितांहि निर्माण करीत असतो. कलाकृति जनतेसमोर येते याचा अर्थच हा. विंदांच्या ठिकाणीं ही जाणीव जागृत असून त्यांच्या कविताच ती सिद्ध करीत आहेत.

संग्रहांत एका पानावरती कवितेच्या मागील पानांवर न राहिलेल्या चारच ओळी छापून बाकी सर्व पान कोरेंच ठेवण्यांत सौंदर्यांत कोणती भर पडते याबद्दल मी साशंक आहें. अशीं अर्धी-मुर्धी पानें संग्रहांत कितीतरी आहेत. एक कविता संपल्यावर लगेच दुसरी कविता अशा धोरणानें जर संग्रह छापला गेला असता तर त्यांच्या ' आततायी अभंगां'ना त्यांत निश्चित जागा झाली असती. विंदांच्या चिंतनशीलतेचें दर्शन त्यांच्या ' आततायी अभंगां 'त आहे.



अनुक्रमणिका








## पुस्तक-परामर्श

### तीन नवे कवितासंग्रह

१. **साद** [ कविः **राम पिंगळीकर**; प्रका. मराठवाडा साहित्य परिषद्, हैदराबाद; ( १९५५ ) किं. एक रुपया ]

२. **उत्तररात्र** [ कविः **त्र्यं. वि. सरदेशमुख**; प्रका: त्र्यं. वि. सरदेशमुख, ९७।८ नवी पेठ, सोलापूर; ( १९५५ ) किं. दोन रुपये ]

३. **पुनः नभाच्या लाल कडा** [ कविः **बी. रघुनाथ**; प्रका. मराठवाडा साहित्यपरिषद् हैदराबाद; ( १९५५ ) किं. तीन रुपये. ]

प्रस्तुत तीन कविता संग्रहांपैकीं '**साद**' व '**उत्तररात्र**' यांच्या प्रकाशनामागें हौसच असलेली आढळते. "आशय, अभिव्यक्ति, अनुभवाची अपरिपक्वता, अनुकरणप्रवृत्ति इत्यादि दोषांची जाणीव मला आहे" ( यापैकीं पहिले दोन दोष कसे ? ) असें स्वत: श्री. पिंगळीकरांनींच म्हटलें आहे. "कवितांचा हा संग्रह माझ्या मित्रांचाच. त्यांनीं काय एवढें मनावर घेतलें, मला अजून पुरें कळलें नाहीं." असें श्री. सरदेशमुख म्हणतात. हे दोनहि संग्रह वाचल्यानंतर असें वाटतें कीं या दोनहि कवींनीं आपल्या ( अथवा, मित्रांच्या ) हौशीला थोडा पायबंद घातला असता तर तें श्रेयस्कर ठरलें असतें. सुट्या कवितांचें जसें कौतुकपूर्ण स्वागत वेळोवेळीं होतें, तसें संग्रहांचें होत नाहीं. कारण संग्रहाचें महत्त्व प्रातिनिधिकता आणि टिकाऊपणा या दृष्टींनीं किती तरी अधिक असतें. काव्यचरित्रा-चा एक टप्पा या नात्यानें संग्रहाचें अवलोकन व परीक्षण होतें. नुकत्याच सुरू झालेल्या व अजूनहि पृथगाकारहीन अशा काव्यचरित्रांचे हे टप्पे अवेळीं सादर करण्यांत आले आहेत.

अर्थातच, एकतीस व तेहतीस कवितांच्या या संग्रहांवरून कवींच्या समग्र काव्यशक्तीवर शेरे मारणें त्यांना बहुधा अन्यायाचें होईल. परंतु, काव्यशक्तीस प्रतिबंधक असे जे दोष या संग्रहांत दिसून येतात त्यांचा उल्लेख केला पाहिजे. इतरांहून निराळया, सर्वस्वीं स्वतंत्र अशा व्यक्तित्वाची अनुभूति येथें नाहीं. त्यामुळें ताजेपणाचा आनंद मिळत नाहीं. त्यांतहि प्रसंगीं अर्थाकडे दुर्लक्ष करूनहि आपलें वर्चस्व प्रस्थापित करणारी शब्दासक्ति जवळ जवळ सर्वत्र दिसते.

'नित नूतन नित विलोल नित नितांत चारुता' अशा गुळगुळीत ओळी 'साद' या संग्रहांत ठिक-ठिकाणीं सांपडतात. कल्पनाहि त्याच त्या; "अड-वितां मेघपुंज, देइ तया थोर झुंज" ( वायुयान ) अशा. एक गमतीची गोष्ट म्हणजे या काव्याविषयीं "हा सारा प्रकार नवकवीच्या थाटाचा आहे" असा शेरा प्रस्तावनाकारांनीं मारला आहे. आपलें विधान स्पष्ट करण्याची तसदी त्यांनीं घेतलेली नाहीं. अर्थात् आश्चर्यमुग्ध होण्यापलीकडे आपल्याला दुसरें कांहींच करतां येत नाहीं.

**सरदेशमुखांच्या** संग्रहांत मात्र

> 'निवांत होतों बसलों आपण
> जमीन होती नांगरलेली
> जवळच अरणीवरचा आंबा
> पाडा येउन लवला होता
> हिरवी तांबुस झांक सुनेरी
> रेखित होती मनांत रेषा
> हिरव्या कच्च्या ...'

अशा साध्या पण उत्कट ओळी क्वचित् कोठें आनंदवितात. आणि साध्या शब्दांचें हें सामर्थ्य अनुभवूनहि कवीचें शब्दवेड कायम राहावें याचें अधिकच आश्चर्य वाटतें. उत्तरोत्तर ते अशाच चांगल्या कविता लिहितील अशी आशा करूं या.

या दोन संग्रहानंतर कै. बी. रघुनाथ यांच्या












कवितेकडे वळलें कीं देशावरच्या उग्र, मातट पण समर्थ आणि उत्साहवर्धक वाऱ्याचा झपाटा अंगावर आल्यासारखा वाटतें. शब्दासक्ति याहि संग्रहांत आहे. रचनेचा धीटपणा आहे, तशीच अर्थाविषयीं बेफिकिरी आहे. पण हे दोष काव्य अनुभवतांना दृष्टीआड होतात, इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं ते गुणरूप होतात. वेल्हूटपणांत क्वचित् परिणत होणारा धीट प्रांजलपणा हें बी. रघुनाथांच्या काव्याचें व्यक्तित्व आहे. हें व्यक्तित्व आपला अस्सलपणा कोठेंहि गमावीत नाहीं. या अस्सल व्यक्तित्वापुढें शब्द हवे तसे वांकतात. उच्छृंखल प्रणयाचा आविष्कार करतांना त्यांचे शब्द उच्छृंखल होतात; आई, वहिनी यांच्याविषयीं बोलतांना ते मर्यादशील होतात; दरिद्री मध्यमवर्गाची हलाखी पाहून ते चिडतात; आणि लाचारी पाहून उपहासहि करतात — वेळीं कवीचाहि :

> ‘ मीहि एक या कवि जगांतला
> माझा मजला मोह न सुटला
> पोटामधल्या आगीसाठीं
> रचुनि कवन फुंकावें. ’

शब्दांनीं असें कार्य करावें, हा अस्सलपणा हेंच बी. रघुनाथांच्या काव्याचें जिवंत वैभव आहे. त्याचे कांहीं नमुने पाहा :

> ‘ गत दुःखांच्या विव्हल स्मृतिपरि
> फिकट फुटे चांदणें ढगावरि ’

किंवा,

> ‘ छायेहुनि सहचरणशील तूं
> वाऱ्याहुनि सहश्वसनशील तूं ’

अशा तरल, नाजुक ओळी लिहिणारा हा कवि ‘ मी भरून आंबेवनीं, येईन लहर होऊनी
तुज करीन उन्मद कंपाकुल पण, नुरेन आलिंगनीं ’

× × ×

‘ नेस नवी साडी
उकल घड्या, होइ आड, लोटुन अर्धें कवाड
जागवि या डोळयांच्या आज जुन्या खोडी ’

× × ×

‘हिच्या नयनकज्जलांत तुमच्या असतिल रात्री लपुनी’

× × ×

> ‘ गलित शृंगारांतहि लोभस
> नवींच ललितें लसलसलीं ’

अशा अस्सल शृंगारिक ओळीहि लिहितो; त्याचप्रमाणें

> सहा फुटाच्या भाउघरामधिं
> स्वप्न उद्याचें उमलू धजलें

× × ×

‘ भूतदयेच्या स्तनीं लागुनी कुठवर विष प्राशावें ? ’ असा उपहासहि कवि करतो; आणि सात्त्विक आनंदहि शब्दित करूं शकतो——

‘ गाउलीच्या पावलांत सांज घरा आली
तुंबलेल्या आंचळांत सांज भरा आली
वहिनीच्या हातांतून सांज सुधा झाली
वहिनीच्या हातासाठीं सांज क्षुधा झाली ’

× × ×

‘ मुलीस आला राग
काय नवल आगींत लागला फुलावयाला बाग. ’

असें हें अस्सल काव्य बी. रघुनाथांच्या अकालीं निधनानंतर मराठवाडा-साहित्य परिषदेनें प्रसिद्ध केलें ही गोष्ट परिषदेस भूषणावह आहे.

— स. शि. भावे

---



अनुक्रमणिका






### श्रद्धा कीं चिकित्सा ?

लेखक- **वा. ल. चिपळूणकर** व **रा. स. भागवत.** प्रका०—द. गो. काळे, मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन, पुणें ४ ( १९५५ )

हल्लींचें युग हें बुद्धिवादाचें व चौकसपणाचें आहे. बुद्धीच्या निष्कर्षावर घासून पाहिल्याशिवाय कोणतेंहि तत्त्व मान्य करायचें नाहीं असा हल्लीं विचारवंतांचा कटाक्ष असतो तर मग अशा काळांत धार्मिक श्रद्धांचें स्थान कोणतें असावें हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. श्रद्धा नेहमींच आंधळी व म्हणून त्याज्य असते व असावी काय ? - याविषयींचे विचार श्री. चिपळूणकर व भागवत यांनीं या छोट्या पुस्तिकेंत मांडले आहेत. ते म्हणतात– " श्रद्धावान् म्हणजे ऐकण्याची इच्छा व वृत्ति ज्याची आहे असा मनुष्य. " त्यांच्या म्हणण्याप्रमाणें श्रद्धा म्हणजे अंधविश्वास ठेवणें नसून सांगितलेल्या किंवा ऐकलेल्या गोष्टीचा शांतपणें विचार करण्याची प्रवृत्ति होय. पर्यायानें श्रद्धा म्हणजे अभिमानरहित, पूर्वग्रहरहित अशी ज्ञानलालसा होय. गीतेंत श्रीकृष्णानें अर्जुनाच्या सर्व प्रश्नांना चिकित्सक पद्धतीनें उत्तरें देऊन त्यास अखेर आपला निर्णय घेण्याचें पूर्ण बुद्धिस्वातंत्र्य दिलें आहे. अशी श्रद्धा चिकित्सक बुद्धीला विरोधक नसते तर उलट उत्तेजक व साहाय्यक असते. श्रद्धेंतहि बुद्धीचा निकष वापरायचा असतो व चौकस बुद्धीनेंच धर्मग्रंथांचें परिशीलन करूनच जें बुद्धीला पटेल तेंच मान्य करायचें असतें. पण कांहीं पुनर्जन्म, मरणोत्तरस्थिति या गोष्टींचें बुद्धीनें आकलन करतां येत नाहीं. बुद्धीला विशिष्ट मर्यादा असतात. तिच्या पलीकडील सत्य तिला समजूं शकत नाहीं म्हणून तें सत्य अस्तित्वांत नसतेंच असें म्हणणें योग्य ठरणार नाहीं. अदृश्य सृष्टींतील सत्यें शुद्ध अन्तःकरण व शुद्ध वर्तन असेल तर अन्तःप्रज्ञा व स्फूर्ति यांना तें प्रतीत होऊं शकेल, असें लेखकांस वाटतें. कांहींहि असलें तरी श्रद्धा ही बुद्धीची अनुसारिणीच असायला हवी नाहींतर ती अंधश्रद्धा शेवटीं मानसिक गुलामींत व अप्रामाणिकपणा व ढोंगबाजींत अवनत झाल्याशिवाय राहात नाही. त्या दृष्टीनें ही लहानशी पुस्तिका विचारास उत्तेजन देणारी आहे.

—ग. ना. जोशी.

---

### दिव्यदृष्टि कशी संपादन करतां येते ?

लेखक. **सी. डब्ल्यू. लेडबीटर** अनुवादक– **अ. गो. कानिटकर.** प्रका०- द. गो. काळे. मराठी थिऑसॉफिकल फेडरेशनकरितां, आपटे रोड, पुणें ४ ( १९५५ ) किं. ४ आणे.

दिव्यदृष्टि मानवाच्या स्थूल व सामान्य दृष्टीपेक्षां निराळी व उच्च प्रकारची असते. तिला अदृश्य सृष्टि बघायला मिळते. ती बीजरूपांत असते व उत्क्रान्तींत फुलत असते. ती मिळविण्यासाठीं इंद्रियांवर असामान्य ताबा मिळवावा लागतो. इंद्रियांच्या बाहेरील व्यापारांची गडबड बंद करून त्यांच्यापलीकडे जावें लागतें. देहावर जबरदस्ती केल्यानें ती प्राप्त होत नाहीं. तो अनिष्ट मार्ग होय. कांहीं लोक भांग व धूर पिऊन किंवा हट योगाचे मार्ग अवलंबून देहाचें कांहीं व्यापार बंद करून ती अनुभवण्याचा प्रयत्न करतात. कांहीं लोक प्राणायाम करून किंवा श्वासोच्छ्वास बंद करून मूर्च्छा आणतात परंतु त्या मार्गांनीं खरी दिव्यदृष्टि प्राप्त होत नसते. त्यासाठीं योग्य गुरूच्या सल्ल्यानेंच व मार्गदर्शनानेंच बौद्धिक, नैतिक विकास व चित्तशुद्धि करून प्रामाणिकपणानें तिची साधना केली पाहिजे. एरवीं तो स्वयंनिर्मित भ्रम होऊन त्यानें अपाय व स्वतःची फसवणूक होण्याचाच अधिक संभव असतो. हा एक गूढ प्रांत आहे व म्हणून या प्रांतांत खरी माहिती, अनुकूल प्रवृत्ति व कुवत असल्याशिवाय प्रयोग करणें धोक्याचेंच ठरतें. तरीपण या पुस्तिकेनें खरी दिव्य दृष्टि काय असते हें हें समजण्यास मदत खात्रीनें होऊं शकेल. हा श्री. लेडबीटर यांच्या एका पुस्तकांतील एका प्रकरणाचा सारांश होय.

– ग. ना. जोशी

---

### ध्यानयोग

ले. **बाबा भारती** ऊर्फ बा. ग. खापर्डे B. A. LL. B. प्रका०– द. गो. काळे, मराठी थिऑसॉफिकल फेडरेशन, पुणें ४ ( १९५५ ). किं. ८ आणे.

श्री. बाबा भारतींच्या मतें कोठल्याहि उच्च आध्यात्मिक प्राप्तीसाठीं मनुष्यास आपली सर्व शक्ति आपल्या इच्छित ध्येयावर केंद्रित करावी लागते. आपल्या ध्येयावर चित्त एकाग्र करावें लागतें. अन्तर्दृष्टि मिळविण्यासाठीं सर्व चित्तवृत्ति नियंत्रित करून चित्ताला

एकाग्र करावें लागतें. श्रीं. बाबा भारतींनीं ध्यान केव्हां, कोठें, कसें करावें याविषयीं अत्यंत मार्मिक सूचना या पुस्तिकेंत केलेल्या आहेत. त्यांच्या मतें आपल्या ध्येयाविषयीं अंतःकरणांत अत्युत्कट आदर, प्रेम व भक्ति असलीं पाहिजेत व त्याच्याशीं समरस किंवा एकरूप झालें पाहिजे. अशा संपूर्ण एकत्वानेंच नवा प्रकाश दिसूं लागतो व नवी जाणीव होऊं लागते. दिव्यदृष्टीला नवीन दिसूं लागतें. मनुष्य हळुहळू सच्चिदानंद ईश्वराच्या जवळ जाऊं लागतो व धारणेच्या अभ्यासानें ही उच्च अवस्था कायम व अखंड रहावयास लागते. खरें म्हणजे बाबा भारतींच्या मतानें एकाग्रता म्हणजे ध्येयवस्तूखेरीज, मूर्तीखेरीज इतर सर्व विश्व विसरून जाणें. एकाग्रतेनें सूक्ष्मदेह स्थूल देहापासून सुटा होण्याचा अनुभव येऊं लागतो व साधकास हलकें वाटूं लागतें. त्याला भगवंताचा प्रसाद मिळूं लागतो. रोमांच उभे राहून रोमारोमांतून वारा बाहेर वाहूं लागतो व अलौकिक शांति व प्रसन्नता अनुभवाला येऊन ती खूप टिकते. ज्याला ह्या अवीट शांतीची गोडी कळते त्याला संसारांत गुरफटण्याचा मोह होत नाहीं. अर्थात् यासाठीं मुमुक्षूला अज्ञानाचा नाश करून क्लेशांतून व दुःखांतून तावून सुलाखून बाहेर पडावें लागतें. साधकाला अनेक अडचणींना तोंड द्यावें लागतें. अहंकारावर विजय मिळवावा लागतो. सद्वर्तनाची जोड द्यावी लागते. त्याला सहानुभूति, प्रेम, ममता, सौम्यता व निर्मळता हे गुण आपल्या आचरणांत आणावे लागतात. सतत प्रयत्नानें व चिकाटीनें साधकास क्रमाक्रमानें अंतिम मुक्ति मिळवितां येऊं शकते; हें एकदम जमणें शक्य नसतें. त्यानें आपल्या कुवतीप्रमाणें व गरजेप्रमाणें योगमार्ग ठरवावे व बदलावे हेंच इष्ट. साधनेस कर्मसंन्यास करण्याची जरूरी नाहीं. बाबा भारतींनीं हा अपरिचित मार्ग सुबोध रीतीनें मांडून वाचकास ध्यानमार्ग कसा आचरावा ह्याची थोडक्यांत कल्पना दिली आहे. सर्वसामान्य वाचकासहि हें पुस्तक समजूं शकणारें असल्यानें प्राथमिक अवस्थेंत तरी ह्याची चांगली मदत होऊं शकेल.

— ग. ना. जोशी

---

## शुद्धिपत्र

या अंकांतील कांहीं ठळक चुकांचें शुद्धिपत्र खालीं दिलें आहे.

पान २. तळटीप ६. Crooke, 'the Tribes and Castes of Oudh and N. W. P. III. 435' अशी वाचावी.

पान ८. पहिला स्तंभ खालून दुसरी ओळ व दुसरा स्तंभ खालून तिसरी ओळ - यांमध्यें 'The Spirits' Book' असें वाचावें.

पान १३. दुसऱ्या स्तंभांत वरून तिसऱ्या ओळींत 'सकृत् - दर्शनीं' असें वाचावें. दुसऱ्या स्तंभांत खालून सहाव्या ओळींतील शीर्षकामध्यें 'सम्यक्' असें वाचावें.

पान १५. पहिल्या स्तंभांत खालून दहाव्या ओळींत 'original sin' असें वाचावें. दुसऱ्या स्तंभांत खालून दुसऱ्या ओळींत Introspection असें वाचावें.

पान १८. पहिल्या स्तंभांत वरून १७ व्या व १९ व्या ओळींत 'स्थायी भाव' असें वाचावें.

पान २०. पहिल्या स्तंभांत खालून अकराव्या ओळींत 'उतरे काढा' असें वाचावें.

पान २२. पहिल्या स्तंभांत वरून नवव्या ओळींत amusement, व तेराव्या ओळींत ridicule असें वाचावें.


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

‘ नवभारत ’ मासिकाचा

# ‘ टिळक-आगरकर-विशेषांक ’

## २३ जुलै १९५६ रोजीं

प्रसिद्ध होईल

## विशेषांकांतील कांहीं लेखक :

त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर, प्रा. प. म. लिमये,
प्रा. गं. बा. सरदार, प्रा. दि. के. बेडेकर, प्रा. नलिनी पंडित,
प्रा. रा. शं. वाळिंबे, प्रा. म. गं. नातू, प्रा. त्र्यं. कृ. टोपे,
कै. आचार्य जावडेकरांच्या अप्रसिद्ध ‘ टिळक-जीवन-
रहस्या ’चा कांहीं भाग.

व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
c/o प्राज्ञप्रेस, वाई ( उ. सातारा )

अनुक्रमणिका